# रजपूत रमणी जया.

( मूळ हिंदीवरून मराठींत लिहिलेली ऐतिहासिक कादंबरी. )

भाषांतरकार,

रा. रा. रामचंद्र नीलकंठ सहस्रबुद्धे वाईकर.

प्रकाशक

चितळे आणि मंडळी, वाई.



सन १९०१

किंमत दहा आणे.

हें पुस्तक,

माझे परमपूज्य वडील

ती. रा. रा. कृष्णाजी वासुदेव सहस्रबुद्धे

आणि

ती. रा. रा. नारायण वासुदेव सहस्रबुद्धे

या बंधुद्वयांचे चरणीं

पितृभक्ति पुरःसर अर्पण केलें असे.

उभयतांचे चरणीं तत्पर,

रामचंद्र.

# प्रस्तावना.

श्रीयुत पंडित कार्तिकप्रसाद यांच्या "**जया**" या नांवाच्या मूळ हिंदी भाषेंतील ऐतिहासिक कादंबरीचें हें पुस्तक मराठी भाषांतर होय. कादंबऱ्यांतून सृष्टिसौंदर्याचीं, निरनिराळ्या कालांचीं व नाना स्थलांचीं मनोहर वर्णनें विस्तृत रीतीनें देण्याची पद्धत आहे; पण या पुस्तकांत प्रायः त्याचा अभाव आहे. या ऐतिहासिक कादंबरींत तशीं वर्णनें देतां येण्यासारखीं स्थलें अनेक आलीं आहेत; पण मूळ लेखकानें तिकडे कानाडोळा करून सरळ गोष्ट देण्याचाच प्रयत्न केला आहे; अर्थात् आम्हांलाही त्यासच अनुसरावें लागलें. या कादंबरींत पातिव्रत्य, बंधुप्रेम, स्वधर्मनिष्ठा, स्वामिनिष्ठा इत्यादि अनेक सद्गुणांचें उत्तम चित्र वाचकांस पहावयास मिळेल यांत संशय नाहीं. आपल्या महाराष्ट्रभाषेंत ऐतिहासिक कादंबऱ्यांची बरीच उणीव आहे ती या पुस्तकाच्या प्रसिद्धीनें यत्किंचित् तरी भरून येईल अशी आशा आहे.

अखेर हें पुस्तक छापून प्रसिद्ध करण्याचें काम "**कादंबरी कल्पद्रुम**" मासिकपुस्तकाचे संपादक **मि. रा. रा. अनंत केशव चितळे** यांनीं केलें याबद्दल त्यांचा मी अत्यंत आभारी आहें.

वाई
ता० १।७।१९०१

भाषांतरकर्ता.

# रजपूत रमणी जया.

## पहिला परिच्छेद.

वर्षाऋतूचे आरंभीं एके दिवशीं प्रात:काळीं अरवली पर्वत श्रेणीचे पायथ्याच्या रमणीय वनप्रदेशामध्यें एक रथ मंदगतीनें जात होता. त्या रथाला श्यामवर्णाची एक दक्षिणी बैलाची जोडी जुंपली होती. ही जोडी शरिरानें धष्ट, पुष्ट व बलिष्ट असून तशीच अति सुंदर होती. दोन्ही बैलांचीं वशिंडें उंच असून अर्धचंद्राकृति मुरडलीं होतीं. त्यांच्या गळ्यांत सोन्याच्या सांखळ्या असून त्यास रुप्याच्या घांटा लटकविल्या होत्या. पाठीवर रेशमी झुली घातल्या असून त्यांच्या किनाऱ्या भरजरीच्या असल्यामुळें तर त्यांस बहुत शोभा आली होती. पायांत घुंगुर, वशिंडावर मोर्चेलें व ठिकठिकाणीं रेशमाचे लांबतें गोंडे या योगानें तर त्या बैलांचें नैसर्गिक सौंदर्य फारच खुलून दिसत होतें. रथही अप्रतिम कारागिराचे हातचा असून तोही सुशोभित केला होता. चित्रकारांनीं आपलें कसोशीचें कौशल्य या रथाच्या बाह्यांगास दाखविलें होतें. रथाचे खांब रेशमी झालरींनें सजविले होते; आणि सोन्याचे कळस व ठिकठिकाणीं रुप्याच्या फुल्या ठोकून सर्व प्रकारें तो रथ शोभायमान् केला होता. सारथी ऊर्फ रथ हाकणाराही जवान होता. त्याचे डोक्यावरील मौल्यवान् पागोटें उजव्या कलावर झुकतें बांधलेलें असून त्याचा पोषाकही कमी किंमतीचा नव्हता. त्याची दाढी लांब असून ती साफ व आकर्ण चढविलेली होती. गळ्यांत सोन्याचा कंठा, एका हातांत चांदीचें कडें व कमरेस कट्यार लटकविलेली होती. अशा तऱ्हेचा हा उमदा सारथी एका हातांत बैलांचा रेशमी कासरा व दुसरे हातांत चाबूक घेऊन मोठ्या सावधगिरीनें हळू हळू रथ हाकीत होता. या रथाबरोबर अनेक दासदासी व कांहीं लष्करी शिपाईही होते.

भगवान् सूर्य नारायण आपल्या अभिनव किरणांनीं जगांतील अंधःकार नाहींसा करण्याकरितां पूर्व दिग्प्रदेशावर उदय पावूं पहात होता; आणि रात्रीचे अंधःकाराचा नाश होतोसा पाहून त्याचे साह्यकर्ते काळेभोर ढगही त्याबरोबर चारी बाजूंनीं हळू हळू नाहींसे होत चालले होते. अद्यापि वनामध्यें प्रभाकराची प्रभा चांगलीशीं पसरली नसल्यामुळें मार्ग चांगलासा दिसूं लागला नव्हता; तोंच वादळानें पुन्हां अंधःकार करून सोडला. वाऱ्याचा सोसाटा, धुळीचा भडिमार व वाळलेला पाचोळा आणि केर यांची गर्दी यांनीं असा कहर उसळून दिला कीं, शेजारचा मनुष्यही ओळखूं येईना. अशा संकटांतूनही ते लोक मोठ्या सावधपणानें व धीमेपणानें चालले होते; व जातां जातां विश्रांतीसाठीं एखादी निवाऱ्याची जागा ते शोधीत होते; परंतु त्यांना त्या विपत्तींतून बचाव होण्यासारखें स्थळ मिळेना. पाहतां पाहतां पाऊसही पडूं लागला. लोकांनीं रथाचे आंतील भागास पाऊस जाऊं नये, ह्मणून त्या सभोंवतीं कांहीं कापड व कमळांचीं पानें वगैरे गुंडाळलीं. कांहीं वेळानें पावसाचा जोर हळू हळू इतका वाढत चालला कीं, त्या मंडळींना मार्ग आक्रमणाचें काम कठीण वाटूं लागलें; परंतु करणार काय ? तेथें आसपास एखादें गांव दिसना, अथवा एखादी झोंपडीही दिसेना; इतकेंच नव्हे, पण पर्जन्याच्या माऱ्यापासून क्षणभर विश्रांति घेण्यास एखादा घनदाट वृक्षही दिसेना. जंगलांतील बिकट मार्ग, काळ्याभोर ढगांनीं आलेली अंधेरी, पावसाचा मारा व त्यामुळें अंगावरील सर्व कपडे भिजून जाऊन ते इतक्या विपत्तींत पडले होते कीं, त्यांना तो प्रवास अतिशय कष्टमय भासूं लागला; तथापि अशा रीतिनें तीन प्रहरपर्यंत तो बिकट मार्ग कंठीत ते मोठ्या निरुपायानें चालले होते. सायंकाळीं प्रहर दिवस राहिला असतां वृष्टीचा जोर कमी झाला, व मधून मधून सूर्य किरणेंही चमकूं लागलीं; तेव्हां या प्रवासी मंडळींना थोडीशी हुशारी आली; व कांहीं शिपाई मुक्कामाला एखादी निवाऱ्याची जागा शोधण्यास गेले. कांहीं वेळानें एका शिपायानें

येऊन त्या मंडळींच्या मुख्यास वर्दी दिली कीं, या डोंगरावर जो डाव्या हाताला एक तुटलेला कडा दिसत आहे, त्याला वळसा घालून पलिकडे गेले ह्मणजे तेथें एक टेंकडी आहे; व त्या टेंकडीवरच एक सुंदर गुहा आहे. ती इतकी मोठी आहे कीं, आपण सर्वजण त्या ठिकाणीं प्रशस्तपणें राहूं शकू. तेथून पाणी अगदीं नजीक असून स्थळ फारच रमणीय आहे. मात्र ती जागा अगदीं एकीकडे असून त्या टेंकडीचे आसपास निबिड झाडी असल्यामुळें जंगली पशूंची थोडी भीति आहे व आतां सूर्य अस्तास चालल्यामुळें रात्री चोरी लुटीचीही भीति वाटते. त्या मुख्य सरदारानें सांगितलें " कांहीं फिकिर नाहीं; आह्मी कांहीं हातांत बांगड्या भरल्या नाहींत. सगळ्या दिवसाचें उपोषण, चालण्याचे श्रम व पावसानें सर्व अंग व कपडे भिजून गारठल्यासारखें झालें आहे, सबब मुक्काम हा केलाच पाहिजे; व दुसरी जागा कोठें नसल्यामुळें त्या गुहेंत मुक्काम करण्याशिवाय दुसरें गत्यंतरच नाहीं. " असें ठरून सर्व लोकांनीं त्या गुहेकडेच जाण्याचा निश्चय केला व ते तिकडे निघालेही. थोडेसें दूर गेले नाहीं तोंच रस्ता इतका बिकट लागला कीं, रथासुद्धां तेथून जाणें महामुष्किलीचें झालें; तरी पण बरोबरच्या लोकांनीं मोठ्या सावधगिरीनें व हुशारीनें बैलासुद्धां रथ त्या गुहेपर्यंत सुखरूप नेला.

त्या गुहेच्या बाहेर एक औरस चौरस छोटेसें मैदान होतें. नजीक एक स्वच्छ पाण्याचें टाकें असून त्याचें पाणी फारच मधुर होतें. गुहेची रचनाही अति रमणीय व मोठी व्यवस्थेशीर होती. उजेडाची व हवा खेळण्याची सोयही तींत उत्तम प्रकारें करण्यांत आली होती. सारांश, हें स्थान जणू वनदेवतांचें वसतिस्थान आहे की काय, अशी वारवार त्यांस शंका येऊं लागली. त्या गुहेपाशीं सर्व मंडळी गेल्याबरोबर चाकर मांणसांनीं ती जागा झाडून झुडपून साफ केली व तेथें एक गालिचा पसरला. नंतर या मंडळींच्या मुख्य सरदारानें रथापाशीं जाऊन बाहेरूनच नम्रपणें विनंती केली कीं, " आज पाऊस पडत असल्यामुळें सर्व दिवसभर फार हाल

सोसावे लागले; सध्यां पाऊस उघडला आहे व सर्व लोकांचा समावेश होण्यासारखी निवाऱ्याची जागाही सांपडली आहे; तेव्हां आज्ञा मिळेल तर आज रात्रीं येथेंच मुक्काम करण्याची व्यवस्था करितों. " याला रथाचे आंतून उत्तर मिळालें कीं, " आपल्या इच्छेनुरूप करावें. "

मुक्काम करण्याचा हुकूम मिळाल्याबरोबर सर्व लोक आपापलें सामान व्यवस्थेशीर लावण्याच्या नादाला लागले. इकडे दासींनीं त्या रथाच्या सभोंवतीं पाऊस लागूं नये, ह्मणून वस्त्रें व कमलपत्रें लाविलीं होतीं तीं काढलीं. एका दासीनें रथद्वाराचा पडदा वर केला. रथाच्या आंतून प्रथम दोन स्त्रिया व त्यांचे पाठीमागून एक परम सुंदर नवयौवना सुकुमार स्त्री उतरली. ही सुंदर स्त्री उतरल्याबरोबर दासींनीं तिच्या सभोंवार घेर केला. या स्त्रीचें अंग प्रत्यंग इतकें सुंदर व डौलदार होतें कीं, विधात्यानें आपलें कौशल्य दाखविण्यास भूतलावर ही दुसरी तिलोत्तमा मुद्दामच पाठविली आहे, असें वाटलें. निरुंद कपाळ, सरळ नासिका, इंदुवदन, रमणीय हस्तपाद, सिंहकटी, रंभोरु, इत्यादि अवयव सर्व जनास गारेगार करून टाकणारे होते. या तिच्या सुंदर अवयवांना तिचें तारुण्य फारच शोभा देत होतें. ज्याप्रमाणें सुकुमार माधवीलता पुष्पांच्या भारानें लचक मारते त्याप्रमाणें ही स्त्री आपल्या सखीजनांच्या खांद्यावर हात टाकून त्या गुहेचे आंत जात असतां यौवनावस्थेच्या भारानें जणूं काय वांकून जाऊन चमकत आहे असें वाटलें. या सुंदरीच्या अंगावर असलेलीं भूषणें व वस्त्रें यावरून अशी कल्पना होत होती कीं, या सुंदरीनें कोण्या तरी अस्सल रजपूत राजाचें कुल शोभविलें आहे. ही सुंदरी अदमासें १५।१६ वर्षांच्या वयाची होती. असो. गुहेच्या आंत गेल्यावर दासीजनांनीं तिला दुसरें वस्त्र नेसावयास दिलें व ती तेथें पसरलेल्या गालिच्यावर जाऊन बसली.

इकडे नोकर मंडळींनीं रथाचे बैल चरावयास सोडून दिले व रथाचीं ओलीं वस्त्रें काढून दुसरीं कोरडीं वस्त्रें त्यास लाविलीं. कांहीं वेळ गेल्यावर त्या राजकुमारीला त्या गुहेंत चैन पडेना, ह्मणून ती पुन्हां रथांत येऊन

निजली. दासदासींनीं सामानाची वगैरे व्यवस्था लावल्यावर जेवणाखाणाची तयारी केली; परंतु या राजकुमारीनें स्वसंतोषानें एक घांसही खाल्ला नाहीं अथवा एक घोटभर पाणीही तिला पिववलें नाहीं.

सर्व लोकांचें जेवणखाण आटपेपर्यंत सूर्य अस्तास जाऊन अंधार पडला. मुख्य सरदारानें रात्रीच्या पहाऱ्याचा बंदोबस्त करून व यथोचित जाग्यावर पहारा कायम करून आपला डेरा रथाच्या अगदीं नजीक दिला. सर्व दिवसाच्या श्रमानें व थकव्यानें बिछान्यावर जाऊन पडतांपडतांच सर्व लोकांस निद्रेनें गांठलें. फक्त पहारेकरी मात्र आपणांस नेमून दिलेल्या जागेवर मोठ्या सावधगिरीनें पहारा करीत होते.

मध्यान्ह रात्रीचे सुमारास आकाश अगदीं निखालस स्वच्छ झालें. असंख्य तारे नभोमंडळांत चमकूं लागले. रजनीनाथ चंद्रमा आपल्या शीतल किरणांनीं त्या निर्जन पर्वतप्रदेशास विशेष शोभा आणूं लागला. अशा वेळीं एक मनुष्य निळ्या वस्त्राचा बुरखा घेऊन दबत दबत चोहोंकडे पहात त्या छावणीचे नजिकच एका दगडाचे आड लपून उभा राहिला. सर्व मंडळीना निद्रा लागली आहे असें पाहून तो त्या दगडाचे अडून निघून छपत छपत त्या राजकन्येच्या रथाजवळ येऊन पोंचला. इतक्यांत पहारेवाल्यानें " कोण आहे " ह्मणून विचारलें; तो शब्द ऐकून दुसऱ्या पहारेवाल्यानेंही तोच प्रश्न केला. त्याबरोबर तो बुर्खा घेतलेला मनुष्य मोठ्या त्वरेनें वांकडीतिकडीं वळणें घेत पळत सुटला; व थोडक्याच वेळांत दिसेनासा झाला. इकडे पहारेवाल्यांस कांहीं शंका आली व त्यांनीं आपल्या मुख्यास जागे करून सांगितलें कीं, " सरदार साहेब, कोणीं एक मुसलमानी पेहेरावाचा मनुष्य अपल्या छावणींत आला होता. माझ्या तो दृष्टीस पडल्याबरोबर मी त्याला पुकारलें. माझा शब्द ऐकिल्याबरोबर दुसऱ्या पहारेवाल्यानेंही ' कोण आहे ' ह्मणून त्याला प्रश्न केला; पण कांहींएक जबाब न देतां तो पळून गेला. "हें ऐकल्याबरोबर सरदारसाहेब बिछान्यावर उठून बसले व कांहीं विचार करूं लागले. एका नोकरानें पुढें हुक्का

आणून ठेवला व त्याचे दम मारीत मारीत सरदारसाहेब गहन विचारांत मग्न झाले. ही गोष्ट त्यानें आपल्या छावणींतील एका चतुर मनुष्यास कळविली; व त्यास त्या आलेल्या मनुष्याचा सुगावा काढण्याकरितां त्यांनीं पाठवून दिला व इकडे आपल्या सर्व लष्करास जागे करून त्यास तयार होण्याचा हुकूम केला. थोड्याच वेळानें तो मनुष्य परत येऊन सांगू लागला कीं, येथून दक्षिण दिशेकडे सुमारें कोस अर्धाकोस अंतरावरील एका टेकडीनजीक कांहीं मनुष्यांचा तळ पडला आहे; व ती फौज मुसलमानांची आहे. लोक कांहीं फार नाहींत; पण २००।२५० पेक्षां कमी तरी खास नाहींत. ते अगदीं कुच करण्याच्या तयारींत आहेत व आपला सुगावा जर त्यास लागला असेल, तर ते इतक्यांत येथें येऊन पोंचतीलही.

ही गोष्ट ऐकिल्याबरोबर तो सरदार विचार करीत करीत रथापाशी गेला, व विनयानें सर्व हकीकत सांगून ह्मणाला कीं, “ जर ते लोक इकडेच येणार असले तर ते कोण आहेत व कशाकरितां येणार आहेत कोण जाणे ? तेव्हां ते येण्याच्या पूर्वींच आपण येथून कूच करावे, हें मला बरें दिसतें. ” याला रथांतून जबाब मिळाला कीं, “ आपण त्यांचें काय केलें आहे ह्मणून ते आपणाला त्रास देतील ? ”

**सरदारः**—ही गोष्ट तर खास आहे कीं, ते लोक मुसलमान असून बादशहाचे शिपाई असावेत. आजकाल आपला व बादशहाचा वैरभाव जास्तच वाढला आहे, तेव्हां जर येथें झगडा सुरू झाला तर आपले लोक यावेळीं अगदीं थोडे असून दमले भागलेले आहेत; तेव्हां ते येण्याच्या पूर्वींच आपण निघून जावे, हें बरें !

**राजकन्याः**—आपला सर्व भरवसा त्या ईश्वरावर आहे व तोच आपलें संरक्षण करण्यास समर्थ आहे; तरी तुमचें ह्मणणेंही यथार्थ आहे. आपल्याजवळ दासदासी व पांचपंचवीसच शिपाई आहेत. दुसरें, यावेळीं मी बाबासाहेबांच्या दुःखानें इतकी होरपळून गेलें आहें कीं, मला कांहीं एक सुचत नाहीं. नाहीं तर मी रजपूत कन्या लढण्याझगडण्याला मागें

पुढें पहाणारी नाहीं. परंतु, स्वस्थितीकडे पाहून आपण काढलेल्या विचा-रास मला सम्मत्ति देणें भाग आहे. सबब तुह्माला वाटेल ते करा व वाटेल तिकडे चला. माझी त्याला मान्यता आहे.

ही आज्ञा मिळाल्याबरोबर सरदारानें सर्व लोकांस कुच करण्याबद्दल हुकुम दिला.

---

## दुसरा परिच्छेद.

ज्या ठिकाणीं या रजपूत राजकन्येची छावणी पडली होती, त्याचे दक्षिणेस मुसलमानी फौजेचा तळ पडला असून प्रथम जो मनुष्य गुप्त रीतीनें राजकन्येच्या छावणींत येऊन पहारेकऱ्यांच्या ललकारण्या-मुळें पळून गेला, तो या मुसलमानी फौजेंतील एक हेर होता; व आपल्या मालकाच्या हुकमावरून तो या छावणींतील बातमी काढण्याकरितां आला होता. येथून परत आपल्या लष्करांत तो गेल्यावर त्याचें व मुसलमानी फौजेच्या सेनानायकाचें पुढीलप्रमाणें संभाषण झालें:—

**सेनानायक**—काय बातमी आणली ?

**हेर**—एका जनानी स्वारीची थोड्या लोकांनिशी छावणी पडली आहे.

**सेना०**—ती स्वारी कसली आहे व बरोबर लोक किती आहेत ?

**हेर**—स्वारी रथावरील आहे व अदमासें ४० लोक बरोबर आहेत.

**सेना०**—ती मंडळी कोणत्या देशांतील असावी, हें तुला सांगतां येईल?

**हेर**—पेहेराव व भाषा यावरून ते रजपूत असावेत.

**सेना०**—आपण ज्यांना धरण्याकरितां निघालों आहोंत, तेच हे लोक नसतील कशावरून ? व आपल्या बापाला अल्लाउद्दीन बादशहानें धरून कैद केला ही बातमी ऐकून रतनसिंहाची मुलगी जया ही पळून जात नसेल कशावरून ? तेथें गेल्याशिवाय कांहीं समजणार नाहीं.

**हेर**—मलाही असेंच वाटतें.

इतक्यांत या यवन सेनापतीनें आपल्या कमरेचा एक छोटासा बिगूल काढून वाजविला. त्याचा शब्द ऐकिल्याबरोबर सर्व शिपाई सज्ज झाले व त्यांनीं त्या गुहेकडे एकदम चाल केली; व तिकडे राजकन्येचे लोक चालूं लागले नाहींत तोंच ही मुसलमानी फौज तेथें जाऊन पोंचली. ही फौज तेथें जाऊन पोंचतांक्षणींच यवनसेनापतीनें प्रथमतः रथावर चाल केली; व आतां रथाचा पडदा उचलणार, तोंच रजपूत सरदारानें त्यांस अडथळा केला; तेव्हां त्या यवन सेनापतीनें त्या रजपूत सरदारास विचारलें, "तुमचें नांव काय ?"

**रजपूतसरदार**—माझें नांव जयमल्ल.

**यवनसेनानायक**—आपण रहाणारे कोठले ?

**र० सरदार**—चितोरचे.

**य० से० नायक**—ही स्वारी कोणाची ?

**जयमल्ल**—स्वारी जनानी आहे.

**यवन से० ना०**—ते तर पडद्यावरूनच समजतें आहे.

**जय०**—यापेक्षां जास्त चवकशी करणारे आपण कोण ?

**य० से० ना०**— आह्मी कोण हें तुह्माला ठाऊक नाहीं काय ?

**जय०**— सुरत तर शिपाई बाण्याची दिसत आहे.

**य० से० ना०**— ज्याच्यापुढें तुह्मी उभे राहत नाहीं व ज्याला भिऊन तुह्मी पळून जाता, त्या बादशाहाचा मी सेनानायक असून माझें नांव सरफराजखां आहे.

**जय०**— क्षत्रियाचें काम भिण्याचें व पळण्याचें नाहीं.

**स० राजखां०**— मग सामना करण्याची हौस आहे कां ?

**जय०**— हौस नव्हती कधीं ?

**स० राजखां०**—तुह्मां १०।२० लोकांबरोबर लढावें काय ? व हौस पुरवावी काय ? तथापि या रथांत कोण आहे, हें समजून घेतल्याशिवाय मी कदापि राहणार नाही.

जया०— हें समजून घेण्याचें तुम्हाला कांहीं कारण नाहीं.

स. राजखां०— लवकर दाखविलें पाहिजे; नाहीतर मला स्वतःला त्याबद्दल तसलीफ घेतली पाहिजे.

इतकें बोलून तो यवन सेनानायक स्वस्थ राहिला नाहीं. त्यानें एकदम रथाचे पडद्यास हात घालून तो खेंचला; पण जयमल्लानें तात्काल त्याला असा एक ठोसा मारला कीं, त्यासरसा तो जमीनीवर पालथा पडला; पण महद्दुःखाची गोष्ट कीं, एका यवन शिपायानें त्याचवेळीं जयमल्लाचे डोक्यावर बंदुकीचा दस्ता जोरानें मारून त्यालाही सरफराजखांचे जवळ जमीनीवर निपचीत पाडला; व त्याच्या म्यानांतील तरवार काढून घेतली.

ही झटापट पाहून त्या राजकन्येनें आपल्या लोकांस स्वस्थ राहण्याबद्दल सांगून त्या यवनसरदारास मोठ्या गंभीर स्वरानें ती रजपूत कन्या ह्मणाली:—" हे सेनानायका, मी मंडलगडचा राजा रतनसिंह याची कन्या आहें. माझें नांव जया. माझ्या बापाला तुमच्या बादशाहानें अन्यायानें कैदेंत टाकलें आहे. "

हें भाषण ऐकतांक्षणीं सरफराजखां इतका चकित व विस्मित झाला कीं, त्याच्या तोंडांतून एक शब्दही बाहेर पडेना अथवा त्याला दुसरेंही कांहीं करितां येईना. तो एखाद्या पाषाणाच्या जड मूर्तीसारखा उभा राहिला. ज्या कार्याकरितां बादशाहानें त्याला सैन्यासह रवाना केला, तें कार्य इतक्या सुलभ रीतीनें होईल, ही गोष्ट त्याच्या ध्यानींमनींही आली नव्हती. बादशाहाचा हुकूम घेऊन जयेच्या शोधास्तव सरफराजखां निघाला, तेव्हां त्याला तें कृत्य अति दुःसह वाटलें होतें. त्याला निघतेवेळेस अशी खात्री वाटत होती कीं, मंडलगड शहरांत शिरल्याबरोबर शत्रूंशीं युद्ध करावें लागेल; व जय होतो कीं पराजय याचीही शंका होती ती दुसरीच. बरें, इतकेंही करून सुदैवानें जय मिळाला, तरी जया हातीं लागते कीं नाहीं याची भीति होतीच; परंतु त्या सर्व गोष्टी एकीकडे राहून अचानक राजकन्या जया त्याच्या हातीं लागली, याबद्दल त्याला अत्यानंद होऊन त्यानें त्याबद्दल अल्लाची प्रार्थनाही केली.

राजकन्येचे ते कोकिलवत् स्वर ऐकून यवनसेनापति सरफराजखां यास मोठी धन्यता वाटली व त्याची पक्की खातरी होऊन चुकली कीं, या जयेच्याच मोहपाशांत बादशाहा अडकून गेल्यामुळें उन्मत्त झाला आहे. जया आपणाला मिळावी ह्मणूनच बादशाहानें राजा रतनसिंहाला दिल्लीस बोलावून आणलें व त्याला आपल्याशीं जयेचा विवाह करून देण्याबद्दल विचारिलें; पण त्यानें ती गोष्ट नाकबूल केल्यामुळें त्याला तुरुंगांत टाकिलें व मला जयेच्या शोधार्थ पाठविलें. अलीकडे बादशहा अगदीं दुःखी असे, याचें कारण आज त्याच्या लक्ष्यांत आलें. आजकाल बादशाहाला खाणेंपिणें आवडत नाहींसें झालें, जनानखान्यांत त्यास चैन पडेना, झोंप नाहींशी झाली, कोणाशीं बोलणें नकोसें वाटूं लागलें, हंसण्याखिदळण्याचें तर नांवच नाहीं, राज्यकारभारांतूनही त्याचें मन उडून गेलें, जेव्हां पहावें तेव्हां तोंडावर उदासीनता आहेच; हा प्रकार ज्या स्त्रीचे स्वरूपाविषयीं नुसतें वर्णन बादशाहानें ऐकिलें, त्यामुळें झाला; मग जर ही प्रत्यक्ष त्याच्या दृष्टीस पडेल तर मग त्याची काय अवस्था होईल ? ती सुरूपसुंदरी आज माझ्यापुढें प्रत्यक्ष उभी आहे. याच मुलीकरितां रतनसिंह तुरुंगांतील कठीण कष्ट भोगीत आहे. इतके हाल होत आहेत, तरी तो खरा रजपूत आपला हट्ट सोडीत नाहीं अथवा त्याला आपला हट्ट सोडण्याची बुद्धी कोठून होणार ? ही शिकार माझ्या हातीं लागावयाची होती ना ? आतां ही माझ्या तावडींतून कसची सुटते. मी दिल्लीहून सुमुहूर्तावर निघालों होतों ह्मणूनच हा अलभ्य लाभ मला अनायासें झाला आहे. आतां जेव्हां मी इजला घेऊन जाईन व बादशाहाला समजेल कीं, आपली प्राणप्रिया जया इजला सरफराजखां घेऊन आला, तेव्हां बादशहा आपणाला फार मोठें बक्षिस देईल; व माझें भाग्य एकदम उदयास येईल. मग दरबारांत माझ्यापेक्षां मोठा कोण असणार ? माझा अशा तऱ्हेनें मानपान झाला ह्मणजे काय माझें वैभव ! ! माझ्यासारखा मीच.

अशा तऱ्हेच्या मनोराज्यांत तो कांहींवेळ अगदीं गढून गेला. थोडा

वेळ गेल्यावर तो मोठ्या नम्रतेनें व अदबीनें राजकन्येस ह्मणालाः—" हे राजकुमारी, न जाणून माझ्या हातून जर कांहीं अपराध घडला असेल, तर मला क्षमा करावी. बादशाहा जिच्या प्रेमपाशांत बद्ध होऊन अगदीं बेफिकीर झाला आहे, त्या आपणच आहांत हें मला ठाऊक नव्हतें. आतां मी आपणांस सविनय विनंति करितों कीं, आपण मजबरोबर दिल्लीला चलावें व आपल्या बापाची कैदखान्याच्या कठीण यातनेंतून मुक्तता करून बादशाहाच्या जनानखान्यास शोभा आणावी. ज्या बादशाहाची स्त्री होण्याकरितां हजारों स्त्रिया इच्छा करितात, तो बादशाहाच आपल्यावर आसक्त झाला आहे, तेव्हां आपण ही अमोल्य संधी व्यर्थ दवडूं नये. आपली व माझी येथें गांठ पडली, ही परमेश्वराची खैरच समजली पाहिजे; व यावरून आतां मला पक्की खात्री वाटूं लागली आहे कीं, आपल्या लोकांच्या विच्छेदाची व आपल्या बापाच्या घोर यातनेची मुदत संपली आहे; व ही गोष्ट माझ्या विद्यमानें झाली, ही परमेश्वराची मजवर कृपाच झाली असें ह्मटलें पाहिजे. "

यवन सेनापतीच्या तोंडचे हे शब्द ऐकून जयेचें अंग भयानें व रागानें संतप्त होऊन लटलट कापूं लागलें; व तिच्या तांडांतून आतां शब्द बाहेर पडणार तोंच तिची प्रिय सखी किशोरी नम्रपणानें बोलूं लागली. ती ह्मणाली:—" आपण आमच्या धनिनीबद्दल अशी आशा याउप्पर धरून बसूं नये. कारण पहिली गोष्ट अशी कीं, आपला बादशाहा जातीचा मुसलमान असल्यामुळें त्याच्याबरोबर आर्यकुलांतील स्त्रियांचें लग्न कसें होऊं शकेल ? दुसरें असें कीं, या राजकन्येचें वाग्दान झालें आहे; व आमच्यांत ज्या स्त्रीचें वाग्दान होतें ती स्त्री विवाह झालेलीच आहे, असें मानतात; तेव्हां आतां इच्या बापाला व्यर्थ तुरुंगांत ठेवणें न्यायविरुद्ध आहे; कारण वाग्दान केलेली मुलगी दुसऱ्यास देण्याचा अधिकार आतां त्यासही राहिला नाहीं. तिसरें, परक्याची वस्तू बळजबरीनें नेणें ह्मणजे धर्मविरुद्ध वर्तन करणें आहे. ह्मणून आह्मां हीनबल अबलांना सोडून द्यावें, अशी आमची तुह्मास प्रार्थना आहे. "

हें भाषण ऐकून यवन सेनापति हंसून ह्मणाला—" तूं जें आतां बोल-लीस तें राजकन्येच्या सम्मतीनेंच बोलली असशील, याबद्दल कांहीं शंका नाहीं; पण याचाही विचार झाला पाहिजे कीं, मी आपल्या मालकाचा ताबेदार आहे. धन्याची आज्ञा मोडणें, आपल्या मालकाच्या इच्छेवि-रुद्ध वर्तन करणें, व स्वामिकार्यांत कुचराई करणें, हें राजनिष्ठ सेवकाला अयोग्य आहे. स्वामीची आज्ञा पाळणें हाच सेवकाचा धर्म होय. केवळ राजकन्येचा शोध करण्याकरितांच बादशाहानें मला पाठविलें आहे व सुदै-वानें अर्ध्या वाटेंतच ती माझ्या हस्तगत झाली आहे; तर मी तिला येथेंच सोडून देऊं काय ! जर मीं असें केलें तर मी अधर्मानें वागलों असें होऊन बादशाहाचा अपराधी होईन. "

दासी किशोरीनें उत्तर दिलें:—" आपलें ह्मणणें अगदीं यथार्थ आहे. मनुष्याला धर्मरक्षणापेक्षां दुसरें कोणतेंही महत्वाचें कार्य नाहीं व मरणा-नंतर धर्माशिवाय दुसरें कांहींही बरोबर येणारें नाहीं; ह्मणून आपण याचा अवश्य विचार केला पाहिजे कीं, एका कुलवान् स्त्रीची अब्रू नष्ट करण्यास बादशाहा तयार झाला आहे. अशा धन्याचें काम ऐकून त्यास पापांत पाड-ण्याकरितां साह्य करणें हें शहाण्या सेवकाला उचित नाहीं; ह्मणून आप-णास मी दोन्ही हात जोडून विनंति करतें कीं, आपण आह्मांला सोडून दिल्यास आपणास कोणत्याही प्रकारचें पाप लागणार नाहीं हें खचित समजा. "

यवन सेनापति ह्मणाला:—"यावेळीं तुह्मांबरोबर हे तर्क वितर्क मी केवढा वेळ करीत बसूं ? अजून थोडीशी रात्र राहिली आहे, तेव्हां सका-ळपर्यंत येथेंच विश्रांति घेऊं. सकाळीं जसें होईल तसें पाहूं. " हें भाषण ऐकून किशोरीही उगीच राहिली. इकडे सरफराजखांस वाटलें, हिंदु-मुसलमानांस एके ठिकाणीं ठेवणें बरें नाहीं; कदाचित् कांहीं बोलाचाली होण्याचा संभव आहे, सबब दोन्ही सैन्यास निरनिराळे ठिकाणीं ठेवणें योग्य आहे. फिरून त्याच्या मनांत असें आलें कीं, कदाचित् सर्व लोकांस

होता झाल्यावर जमा पडून जाईल. ह्मणून त्यानें रथाच्याभोंवतीं नागव्या तरवारीचा पहारा ठेवला व आपणही रथाजवळच राहिला. इकडे जखमी झालेला जयमल्लही रथाचे जवळच पडून राहिला. यानंतर कांहीं बोलाचाली झाली नाहीं, पण मुसलमानांचें तोंड त्यांच्या नैसर्गिक स्वभावाप्रमाणें बंद राहिलें नाहीं. ते हिंदु लोकांचे हृदयास लागतील, अशीं मर्मभेदक भाषणें बोलतच होते.

---

## तिसरा परिच्छेद.

मध्यान्ह रात्र उलटून गेली होती, त्या गिरीप्रदेशावर जिकडे तिकडे सामसुम झाली होती, निद्रा आपलें अखंड राज्य करीत होती, पहारेवाले मात्र पराधीनतेमुळें अर्धेमुर्धे जागृतावस्थेंत होते, फक्त केव्हां केव्हां रजनीचर, भूचर व खेंचर जीवांचा शब्द ऐकूं येत होता आणि वायूचे गतीमुळें झाडांच्या पानांचा सुळसुळ आवाज त्या शांततेचा भंग करीत होता. अशा वेळीं रथामध्यें बसलेली जया तळहातावर गाल टेकून चिंतेनें अगदीं व्याकूळ झाली होती. तिचें मन पुढील विचारानें अगदीं दुभंग होऊन गेलें होतें. जया आपल्या मनाशींच ह्मणते—" हाय हाय !! मी किती अभागी !!! आतां या दुष्ट यवनांच्या हातून माझी सुटका होणें दुर्घट आहे. यांच्याबरोबर लढाई खेळूनही मी यांच्या हातांतून सुटेन, अशी आशा करणें व्यर्थ आहे. ही गोष्ट अगदीं पक्की ठरल्यासारखीच झाली आहे कीं, मला यांच्याबरोबर दिल्लीस जावें लागणार व तेथें गेल्यावर बादशाहाच्या महालरूपीं कैदेंत रहावें लागणार. आतां कदाचित् मी तेथें गेल्यावर बाबांची त्या दुःखांतून मुक्तता होईल, पण त्यांची माझी गांठ कसची पडते ? अथवा त्यांच्या कुलाला कलंक लावणाऱ्या या अभागिनीचें ते दर्शन सुद्धां घेणार नाहींत. हायरे देवा !! तुझ्या मनांत माझी अशी दशा करण्याचें होतें काय ! देवा, मला तूं हें रूप कशाला दिलेंस ! ज्या

सौंदर्याकरितां अनेक लोक जप, तप, दान करतात, तेंच सुंदर रूप मला दुःख देण्यास कारण झालें! या सुंदर स्वरूपानें माझ्या धवल कुलास कलंक लागणार!! हाय!! या सुंदरतेबद्दल जर मला कुरूपता आली असती, तर माझ्या कुलास कलंक तरी न लागता! हे विधात्या, मला रूपवती करण्याचेंच जर तुझ्या मनांत होतें, तर राजकुलांत मला जन्म कशाला दिलास? एखाद्या गरीब कुलांत मला जन्माला घातलें असतेंस तर बाद-शाहाला माझ्या सुस्वरूपतेची बातमी कशाला लागली असती? व तो माझ्या इच्छेनें इतका इरेस तरी कशाला पेटला असता? या जगतामध्यें माझ्या-सारख्या सुस्वरूप स्त्रिया कितीक असतील, पण त्यांची दाद कोण घेत आहे? सामान्य अवस्थेंत राहून मानमर्यादेनें आयुष्याचे दिवस कंठणें किती सुखदायक आहे? या सुस्वरूपतेमुळें लोक मला कुलकलंकिनी म्हणतील! जगतामध्यें माझें कुयश लोक गातील! लोकांच्या दृष्टीनें मी अगदीं तुच्छ-वत् मानली जाईन! हाय हाय!! मी आतां काय करूं?!! या दुष्टांच्या हातून माझी सुटका कशी होईल? या विपत्तीमध्यें मला कोण साहाय्य करील? आजपर्यंत ज्या देवतेचें मीं आराधन केलें आहे व कायावाचामनेंकरून ज्याची सेवा, भक्ति व अर्चन केलें आहे, त्याजवर आतां मुसलमानीण बनून अश्रद्धा करूं काय? तो अतुल पराक्रमी, वैभवशाली व जगद्विख्यात् नसेना, मला त्यांशीं काय करावयाचें आहे? माझ्या पित्यानें ज्याला मला देण्याचें निश्चित केलें आहे, त्यालाच मीं आपलें तनमन अर्पण केलें आहे व तेंच माझें परमाराध्य उपास्य दैवत होय. त्यांना सुख तेंच मला सुख; त्यांचें दुःख तेंच माझें दुःख!! तोच माझ्या प्राणाचा एकटा मालक आहे. हाय! यावेळीं ते कोठें असतील? माझ्या या विपत्तीब-द्दल त्यांना वर्तमान कळलें असेल काय? जर ही खबर त्यांना कळती तर आपल्या भावी धर्मपत्नीच्या सुटकेकरितां ते विलंब करतील काय? खचित नाहीं. तर मग आतां मी काय करूं? त्यांना ही बातमी कशी कळेल? हे चराचर निवासी परमेश्वरा, जर मी कायावाचामनेंकरून

आपल्या प्राणपतीचे चरणाचा ध्यास घेतला असेल आणि या त्रिभु-वनामध्यें जर मी त्यालाच प्राणवल्लभ मानीत असेन, तर या संकटांतून माझी लवकर सुटका होईल. हे बलवान् दुष्ट यवन मला दुबळ्या अबलेला कैद करून दिल्लीस घेऊन चालले आहेत. परमेश्वरावर माझा दृढ विश्वास आहे व माझी खात्री आहे कीं, पातिव्रत्यरूपी धर्माग्नीमध्यें हे दुराचारी यवन तृणा-प्रमाणें भस्म होऊन जातील. दुर्दैवानें दिल्लीस जावें लागलेंच तर आपल्या व बाबांच्या मुक्ततेकरितां हातापाया पडून बादशाहाची प्रार्थना करीन. आतां ते मदांध दुराचारी उन्मत्ततेनें माझ्या प्रार्थनेकडे दुर्लक्ष करतील तर आत्म-हत्या करणें तर माझ्या स्वाधीन आहे. कोणत्याही प्रकारानें या पापमय देहाचा मी त्याग करीन. आत्महत्या करणें मोठें पाप आहे, असें म्हण-तात. आत्महत्या करणाराला घोर नरकयातना भोगाव्या लागतात; ठीक; मला तें अगदीं कबूल आहे. परंतु, स्त्रियांना उत्तम सांगितलेला जो पाति-व्रत्यधर्म तो हे प्राण ठेवून मी मोडूं काय ? दुसरें, मी मेल्यावर बाबांचीही कारागृहांतून सुटका होईल व प्राणपतींनाही बादशाहापासून त्रास होणार नाहीं. या कुडींत प्राण आहेत तोंपर्यंत या देहाला स्पर्श करण्याची कोणाची शक्ति आहे ? पहावें आतां माझ्या नशीबांत काय लिहिलें आहे ?"

अशा तऱ्हेनें जया चिंतासमुद्रांत गटकळ्या खाऊं लागली. केव्हां विधात्याला दोष द्यावा, कधीं आपल्या पूर्व कर्मांना दोष द्यावा, कधीं दुःखानें स्तब्ध व्हावें तर कधीं आशा उत्पन्न होऊन आवेश यावा व पुन्हां स्थिर व्हावें, अशा विचारांत सर्व रात्र निघून गेली.

पंचपंच उषःकाल झाला. भूदेवी तुषाराम्बूनें स्नान करून, नीलवस्त्र सोडून, श्वेतांबर परिधान करून आणि अरुण प्रभारूपीं सिंदूर तिलक धारण करून आपलें सुस्वरूप दाखवूं लागली. यावेळीं सौगंधिक पुष्पपरा-गानें भरून गेलेला वायू मंद मंद गतीनें वाहूं लागला. या वायूच्या स्पर्शानें कोकिलादि पक्षीगण आनंदित होऊन समस्वरानें गाऊं लागले व अंधःकार प्रिय रजनीचर उलूकादि पक्षी वृक्षांच्या पोकळींतून आणि

वृक्षांच्या खबदडींतून दडून बसले. इकडे भगवान् दीनानाथ आपल्या कोमल किरणांनीं तो गिरिप्रदेश शोभवूं लागला. प्रातःकाळ झालासें जाणून निद्रित मनुष्यें डोळे चोळीत व जांभया देत उठून बसले. यवन सेनापतीनें कूच करण्याचा बिगूल वाजविला; त्याबरोबर मुसलमानी सैन्य तयार झालें. यवन सेनापतीला वाटलें कीं, रजपूत शिपायाजवळ शस्त्रें नसावींत व त्याप्रमाणें त्यानें जयमल्लास सांगितलेंही; पण त्याबद्दल बराच वादविवाद झाला. तेव्हां जयेनें आपल्या एका दासीबरोबर यवन सेनापतीला सांगून पाठविलें कीं, आपले लोक माझ्या लोकांपेक्षां पुष्कळ आहेत आणि मी अबला असून निर्दोषी व शक्तीहीन आहें. तसेंच माझ्या सेवकांची संख्या फारच थोडी किंबहुना मुळींच नाहीं म्हटल्यास चालेल. आपण सबल व सदल आहां; तरी धर्माला अनुसरून व वीरांचे रीतीप्रमाणें आणि कृपेनें आपण माझ्या लोकांवर जुलूम करूं नये. आतां न्यायान्यायाचा विचार न करतां आम्हांला दिल्लीस घेऊन जाण्यांतच जर आपण पुरुषार्थ व धन्यता मानीत असाल तर क्षत्रियांना शस्त्रहीन करण्याची तरी कल्पना मनांत आणूं नका, अशी माझी विनंती आहे. कारण वीर लोक जोंपर्यंत धडावर शीर आहे, तोंपर्यंत आपलें शस्त्र कदापि दुसऱ्याचे हातीं लागूं देत नाहींत व शस्त्राकरितां आपलें शीरही देण्यास ते मागेंपुढें पहात नाहींत. शिवाय हेंही आपण पक्कें लक्षांत ठेवा कीं, वीरकन्या जया अपमान सहन करून मुसलमानांची बंदीवान् कधींही होणार नाहीं. ”

जयेचा हा वीरश्रीचा निरोप ऐकून महत्वाकांक्षी व लोभी सरफराजखां चपापून गेला व त्याला याचा परिणाम काय होतो याची मोठी भीति पडली. त्याला वाटलें कीं, जर आज मी जयेच्या मर्जीविरुद्ध वागलों, तर उद्यां ती बादशाहाची पट्टराणी झाल्यावर माझ्याविरुद्ध बादशहाचें मन वळवील व आपलें मनोराज्य व्यर्थ होईल; तर शक्य असेल तो यत्न करून इच्या मर्जीविरुद्ध वागतां उपयोग नाहीं. असा विचार करून सरफराजखां रथाजवळ जाऊन मोठ्या नम्रतेनें म्हणाला,

“ आपल्या मर्जीविरुद्ध वागून आपल्या मनाला अथवा स्वधर्माला बाध याचा असा आग्रह करावा नाहीं; तथापि आपणांस इतकें कळविलें पाहिजे कीं, लष्कर कूच करण्यास अगदीं तयार झालें आहे, तर आपल्या इच्छेस येईल त्याप्रमाणें वर्तावें. ”

हें सर्व भाषण ऐकून जयेनें आपल्या लोकांस चलण्याचा हुकूम दिला; तेव्हां यवनसेनापतीनें मोठ्या चतुराईनें राजकन्येच्या रथाभोंवतीं आपल्या सैन्याचा वेढा दिला व आपण आलों त्याच मार्गानें परत जाण्याचा हुकूम केला. हा मार्ग बराच कठीण होता, तरी मोठ्या हुशारीनें तें सर्व सैन्य त्या रथासह एका सपाट मैदानावर येऊन सुखरूप पोंचलें; व दिल्लीच्या मार्गास लागलें; इतक्यांत एकाएकीं समोरून धुळीचे लोळचे लोळ दिसूं लागले.

---

## चवथा परिच्छेद.

ते धुळीचे लोळ पाहून मुसलमानी फौजेचें असें अनुमान झालें कीं, जंगलांतील सोसाट्याचे वाऱ्यानें हें अवडंबर उठलें आहे; परंतु हें त्यांचें अनुमान होतें न होतें तोंच घोड्यांच्या टापांचा स्पष्ट आवाज ऐकूं येऊं लागला, घोड्यांच्या खिदळण्यानें कानठळ्या बसूं लागल्या व भाले-तरवारींचा लखलखाट त्यांच्या दृष्टीस पडला. त्याबरोबर सरफराजखानें जयेच्या रथाला वेढा दिला. इकडे समोरून हळूं हळूं घोड्यावर बसलेल्या रणदक्ष व सशस्त्र स्वारांच्या झुंडींच्या झुंडी यवन सैन्यावर जणूं हल्ला कर-ण्याच्या इरायानें पुढें येऊं लागल्या. या सैन्याचा नायक परम शौर्यवान् असा एक तरुण पुरुष होता. याचें वय अजमासें २४।२५ वर्षांच्या दर-म्यान असावें. याचा रंग तप्त सुवर्णाप्रमाणें असून कपाळ उन्नत होतें व त्यावर केशराचा त्रिपुंड्र शोभायमान् दिसत होता. नेत्र विशाल असून

भिंवया धनुष्याकार होत्या. छाती प्रशस्त असून बाहू दीर्घ होते. मस्तकावर शिपाई बाण्याचा फेटा बांधला होता व त्यावर शिरपेंच लटकावला होता. कानामध्यें मोठ्या पाणीदार मोत्यांचा चौकडा लटकावला असून गळ्यामध्यें रुद्राक्ष, मोती व पोवळी घातल्याच्या योगानें यांचा कंठ फारच खुलत होता. याचा पोषाख लढाईला योग्य असा असून हातांत धनुष्यबाण आणि भाला व पाठीवर भाते आणि ढाल होती. याशिवाय कमरेस कट्यार, बिचवा, तरवार इत्यादि आयुधें लटकाविलीं होतीं. असा हा सशस्त्र उमदा पुरुष एका आरबी घोड्यावर स्वार झाला होता. याला पाहून हा कोणी रजपूत वीर राजपुरुष असावा, असा भास होई.

आपल्या समोर बादशाही निशाण फडकत आहेसे पाहून यानें आपलें सैन्यास थांबण्याचा एकदम हुकुम दिला; व एका चतुर हेराला तिकडील बातमी आणण्यास पाठविला. कांहीं वेळानें हेरानें येऊन वर्दी दिली कीं, राजा रतनसिंहाची कन्या आपल्या चाकर माणसासहीत कोठें जात असतां मुसलमानी सैन्यानें वाटेंतच तिला तिच्या चाकर माणसासह कैद केले, व यवन सेनापति तिजला आतां दिल्लीस घेऊन चालला आहे. राजकन्येचे साथीदार अगदीं दीनवाणीनें साह्य मागत आहेत व राजकन्या बादशाही फौजेच्या पहाऱ्यांत रथामध्यें बसलेली आहे.

हे हेराच्या तोंडचे शब्द ऐकल्याबरोबर तो राजपुत्र अगदीं संतप्त झाला. क्रोधानें त्याचें सर्व अंग स्फुरण पावू लागलें व त्यानें त्याच हेराचे मार्फत सरफराजखांकडे निरोप पाठविला कीं, " जर तुला आपल्या जिवाची काळजी असेल, तर हा निरोप पोंचतांच राजकन्येला तिच्या सांथीदारासह एकदम बंधमुक्त कर, नाहींतर लढाईस तयार हो. " हा निरोप हेरानें जसाचा तसाच सरफराजखांजवळ जाऊन सांगितला.

दुताच्या तोंडून हा निरोप कांनीं पडताक्षणींच यवन सेनापतीचा क्रोधाग्नि अगदीं भडकून गेला; व त्यानें त्याच दूताच्या हातीं मोठ्या दिमाखानें परत निरोप पाठविला कीं, " आपण भ्रमांत पडून आपणास व

आपल्या सैन्यास अपाय करून घेऊं नका. ही दिल्लीपती बादशाहाची पराक्रमी सेना आहे, हें लक्षांत वागवून आपला रस्ता सुधारावा, नाहीं तर आमच्या तडाक्याखालीं व्यर्थ चिरडून जाल." दूतानें उत्तर दिलें, "बरोबर आहे. मदांधांना आपल्या कृतकर्माचा परिणाम काय होतो, हें समजत नाहीं. म्हणून पुन्हां सांगतों कीं, क्षत्रियांच्या भाल्याला बळी पडण्याचें धाडस करूं नका; व राजकन्येला सोडून देऊन आपला रस्ता सुधारा." यावरही यवन सेनापतीनें तोऱ्यानें उत्तर दिलें, तें ऐकून तो दूत—हेर—आपल्या धन्याकडे परत आला व झालेली हकीकत त्यानें इत्थंभूत राजकुमारास सांगितली. हेराच्या तोंडची ती दर्पोक्ती ऐकिल्याबरोबर राजपुत्रानें आपल्या सैन्यास एकदम हल्ला करण्याचा हुकुम दिला. त्याबरोबर रजपूत सेना बादशाही सैन्यावर चित्त्यासारखी तुटून पडली. दोन्ही सैन्यांत निकराची लढाई सुरू झाली. रजपूत सैन्यानें मुसलमानांची बकऱ्याप्रमाणें कत्तल केली. युवराजाचें खुद्द सरफराजखांबरोबर निकराचें युद्ध झालें; त्यांत युवराजानें आपल्या अत्युत्तम कारवाईनें सरफराजखांस असा एक तडाका मारला कीं, त्याबरोबर खांसाहेबांची स्वारी घोड्यावरून धाडकन् खालीं पडली; तेव्हां त्यास त्याच्या सेवकांनीं उचलून रणभूमीवरून पळविलें. सेनानायकाची ही दशा झाल्याबरोबर यवनी सैन्याचा धीर सुटून ते रानोमाळ पळत सुटले, रजपूत सैन्यानें त्यांचा पाठलाग केला, परंतु युवराजानें त्यांस परत बोलाविलें.

---

## पांचवा परिच्छेद.

रजपूत व यवन यांचेमध्यें मोठ्या वीरश्रीनें होत असलेला तो युद्ध चमत्कार जया रथाचे पडद्यामधून पहात होती. वीरसिंहाचा पराक्रम आणि त्याचें युद्धकौशल्य तिनें पूर्वींच ऐकिलें होतें, परंतु आज प्रत्यक्ष डोळ्यानेंच त्याचा ती अनुभव घेत असल्यामुळें तिच्या मनाची स्थिति

वारंवार बदलूं लागली व तिचें मनांत नाना प्रकारच्या विचारलहरी उचं-बळूं लागल्या. हे दुष्ट यवन आपल्या प्रियकराचे सैन्यापेक्षा बलिष्ठ नसतील-लना ? जर या संग्रामामध्यें त्यांना एखादी जखम झाली तर कसें होईल? या विचारानें तिचें मन केव्हां उद्विग्न होई व प्रियकरास यश यावें ह्मणून ती डोळे मिटून ईश्वराचें मनःपूर्वक आराधन करी. केव्हां प्रियकराचें शौर्य पाहून तिची वृत्ति प्रसन्न होई व केव्हां केव्हां आपल्या हतभाग्यते-बद्दल निराश होऊन ती ह्मणे कीं, हायरे परमेश्वरा, हा रणसंग्राम माझ्याच करितां चालला असून प्राणनाथ माझ्याचमुळें या संकटांत पडले आहेत. अशा अनेक विचारानें तिचें चित्त अगदीं व्याकूळ झालें. जया ही क्षत्रि-याची कन्या असल्यामुळें प्राणनाथाचें शौर्य पाहून इच्याही अंगांत वीरं-श्रीचा संचार होई; पण लज्जेमुळें तिच्यानें रथाचे बाहेर येववले नाहीं.

यवन सेनापती पडल्यावर त्याचें सैन्य रानोमाळ पळालें व त्याचा पाठ-लाग रजपूत सैन्यानें केला; त्यास परत बोलावण्याकरितां राजपुत्रही त्याचे पाठीमागें निघून गेला. इतक्यांत जयेचे पाठीमागून कांहीं लोक दौडत येत असलेले दृष्टीस पडले; त्याबरोबर जयेचे पोटांत धस्स झालें. यवनांच्या साह्यास हें दुसरें सैन्य आलें आहे, असें समजून तिचें हातपाय अगदीं गळून गेले. इतक्यांत एक सैनिक रथाचे जवळ आला व ह्मणाला, “ ही विलंब करण्याची वेळ नव्हे. झटदिशी रथावरून उतरून या मेण्यांत बसा ! ” हे शब्द ऐकल्याबरोबर जया चपापली; पण जेव्हां तिनें त्या मनु-ष्याकडे निरखून पाहिलें तेव्हां तिच्या ध्यानांत आलें कीं, आपल्यास मेण्यांत बसावयास सांगणारा मनुष्य आपला चुलता बलभद्रसिंह याचा सेनापती आहे. तेव्हां ती निःशंकपणें रथाखालीं उतरली व मेण्यांत जाऊन बसली व भोयांनीं मेणा जंगलाकडे चालविला. तेव्हां जयेचे मनांत असा विचार आला कीं, जर मी अशीच निघून गेले तर प्राणवल्लभांना आपला कांहींच शोध लागणार नाहीं; ह्मणून तिनें आपल्या एका विश्वासू सेव-कास मागें ठेवला व त्याजवळ सांगितलें कीं, राजपुत्र परत आल्यावर त्यांस

माझा असा निरोप कळीव कीं, “ जया आपल्या चुलता बलभद्रसिंह यांचे-कडे जैसलमिरास गेली. ”

मेण्यांत बसल्यावर जयेला पुन्हां आपल्या दुःखाची स्मृति झाली व ती आपल्या मनाशींच विचार करूं लागली कीं, “ मी किती भाग्यहीन आहे. माझ्या कपाळीं सदां दुःख भोगावयाचेंच आहे काय ! बाबांना दिल्लीस कैदेंत टाकल्याचें वर्तमान ऐकून घराबाहेर निघालें, तों मुसलमानांच्या ताव-डींत सांपडलें; प्राणनाथांनीं अकस्मिक येऊन मला त्या दुष्टांच्या हातून सोडविलें. हाय हाय ! ! ज्या प्राणनाथांनीं मोठ्या परिश्रमानें मला शत्रूच्या हातून सोडविलें, त्यांच्याबरोबर चार शब्द बोलण्याचीही मला संधी मिळूं नये काय ? माझ्याबद्दल त्यांना कांहीं एक हकीकत कळली नाहीं तोंच काकांचा सेनापती येऊन पोंचला. बरें, या सेनापतीच्या ह्मणण्यास मान न देतां प्राणनाथ परत येईपर्यंत तेथें वाट पहात बसावें, तर जनरीतिविरुद्ध वर्तन केल्यासारखें झालें असतें. शिवाय ज्यांच्याशीं माझें अद्याप विधीपूर्वक लग्न झालें नाहीं, त्यांच्याशीं मी कशी बोलूं ? माझ्या मनांत हा विचार आला, पण प्राणनाथांना याबद्दल काय वाटेल ? या गोष्टीचा विचार करूं लागलें ह्मणजे अनेक संकल्पविकल्प मनामध्यें उठतात. असो. आतां मी काकांचे कडे चालले आहे, पण तेथें तरी मला सुख कोठून लागणार ? कारण ज्या काकूनें माझ्या आईच्या पश्चात् माझें लालनपालन आपल्या स्वतःच्या पोटचें पोरापेक्षांही जास्त केलें, माझे हट्ट पुरविले व मला आईची आठ-वणही होऊं दिली नाहीं, ती तर माझ्या दुर्दैवानें केव्हांच मरून गेली. आतां माझी ही नवी चुलती माझ्याशीं कशी वागणूक ठेवील कोण जाणे ? व माझ्याकरितां काकांना काय दुःखें सोसावीं लागतील कोणास ठाऊक ? कारण माझें दुर्दैव माझ्या पाठीमागें हात धुवून लागलें आहे. अस्तु. पुढील आशेवर भरंवसा ठेवून हे संकटाचे दिवस कसें तरी ढकलले पाहिजेत. ” अशा तऱ्हेनें नानाप्रकारचे तर्क वितर्क जया वाटेनें करीत होती.

---

# सहावा परिच्छेद.

प्रातःकालचा समय झाला आहे, भगवान् दिनराजाच्या कोमल किरणांनीं पृथ्वी शोभायमान् दिसत आहे, आकाश स्वच्छ झालें आहे, दशदिशा प्रभेनें शुभ्र दिसूं लागल्या आहेत, पूर्वदिशेकडून किंचित् आरक्त किरण पृथ्वीवर पसरून त्याचा प्रकाश जलामध्यें फारच शोभा देत असल्यामुळें प्रत्यक्ष सूर्यनारायण प्रातःस्नानाचे निमित्तानें जलामध्यें अवतीर्ण झाले आहेत कीं काय, असें वाटूं लागलें आहे, वृक्षांच्या पानांवर विचित्र चकचकाट दिसत आहे व मध्यें मध्यें वृक्षाखालीं कवडासे चमकत असल्यामुळें तर विलक्षण शोभा दिसत आहे. रात्रीचे शिशिरबिंदु झाडाचे पानावर व गवतावर मोत्याप्रमाणें चमकत आहेत, पक्ष्यांचा चिलचिलाट चालला आहे व ते या झाडावरून त्या झाडावर अशा चंचलतेनें उडत आहेत कीं, भूदेवीनें प्रातःकालच्या दरबारची व्यवस्था जणूं काय यांजकडेच सोंपविली आहे.

अशा रमणीय सुप्रभात समयीं दिल्ली येथें राजवाड्यानजीकचे पुष्पोद्यानांतील जलमंदिराचे संगमरवरी गच्चीवरील एका आरामखुर्चीवर बादशाहा अल्लाउद्दीन हुक्का ओढीत पडला होता. त्याची दृष्टी एक सारखी बंगल्यासभोंवतालच्या जलाकडे लागलेली आहे, असें पहाणारांस वाटे; परंतु, आपण कशाकडे पहातों आहे, याची शुद्ध बादशाहास मुळींच नव्हती. त्याचें मन जिकडे पहात होते, तिकडेच तो पहात होता. काय मनालाही डोळे आहेत ! अथवा मनाला जर डोळे असते, तर त्याची अशी दशा कां झाली असती ? यावेळीं बादशाहाचें मन त्यानें जिच्या बापास कैदेंत टाकलें होतें त्या सुरूपसुंदरीकडे लागलें होतें. बादशाहाचे जवळच खुर्चीच्या नजिक तरवारीच्या मुठीवर दोन्ही हाताचा जोर देऊन थोडी बाकदार मान केलेला एक तरुण मुसलमान पुरुष उभा होता. याचा रंग गोरा, मोठे नेत्र, थोडी दाढी, खांद्यापर्यंत केश, डोक्यावर दक्षिणीशेल्याचा फेटा बांधलेला, अंगांत सरबत्तीचा अंगरखा, कमरेस पट्टा व पायांत कमानदार

जोडा, अशा थाटाचा तो पुरुष होता. त्याला हाक मारून बादशाहा ह्मणतो:— " खुदादादखां, मंडलगडचा सरदार किती हट्टी आहे पाहिलासना ? इतका त्रास सोसूनही तो आपला हट्ट सोडण्यास तयार होत नाहीं. " याला उत्तर देतांना खुदादादखां ह्मणाला– " बादशाहासाहेब, तो सरदार मला फार मूर्ख व हट्टी दिसतो. " यावर बादशाहा ह्मणतो, " हा त्याचा हट्ट किती दिवस चालेल ? मी मंडलगडास फौज रवाना केली आहे, हें वर्तमान त्यास कळलें नाहीं तोंपर्यंत. बरें, पण अद्यापि सरफराजखांकडून कांहींच निरोप कळत नाहीं हें काय आहे ? " खुदादादखां हात जोडून ह्मणाला–" आज्ञा होईल तर खबर आणण्याकरितां सांडणी स्वार रवाना करितों. "

. बादशाहा यांजवर कांहीं बोलणार होता, इतक्यांत चोपदारानें सलाम करून विदित केलें कीं, " सरदार सरफराजखांचे लष्करांतील एक शिपाई देवडीवर आला आहे. हुकम होईल तर आंत पाठवून देतों. " बादशाहानें त्यांस त्याला पाठवून देण्याबद्दल सांगितलें. चोपदारानें देवडीवर जाऊन त्या शिपायास बादशाहाकडे पाठविलें. शिपाई आंत आल्याबरोबर सलाम करून ह्मणाला–" खाविंद, आह्मी लोक सरफराजखांबरोबर मंगलगडास जात होतों. वाटेनें आह्माला एक पहाड लागला. सायंकाळ झाल्यामुळें आह्मी तेथेंच मुक्काम केला. मध्यरात्रीचे सुमारास आह्मास अशी बातमी लागली कीं, समोरच्या टेंकडीवर कांहीं लोकासहीत एक जनानी स्वारी उतरली आहे. ते लोक चितोराकडील असावेत, अशी आह्माला शंकांही आली. तेव्हां आह्मी त्या ठिकाणीं जाऊन त्यास अडविले व त्याचा पुसतपास केला, पण ते आह्माला दाद देईनात, तेव्हां आपल्या सरदार साहेबांनीं तिकडील रजपूत सरदारास असा ठुस्सा लगावला कीं, तो जमीनीवर धाडकन् पडला. तो पडताक्षणींच रथाचे आंतून उत्तर आलें कीं, ' मी मंगलगडच्या राजाची कन्या आहे. ' " हे शब्द त्या शिपायाच्या तोंडांतून बाहेर पडतांक्षणींच बादशहा ताडकन उठून

बसला व ह्मणाला, " वरील उत्तर देतांना तिनें रथाचा पडदा एकीकडे केला होता काय ?

शिपाई— नाहीं महाराज, तिनें रथाचा पडदा एकीकडे न करतां आंतूनच उत्तर दिलें. आपल्या सरदारसाहेबांनीं तिच्याशीं भाषण करतांना अशी साखर पेरून दिली कीं, ती आह्माबरोबर दिल्लीस येण्यास राजी झाली.

बादशाहा—बरें मग पुढें काय झालें ?

शिपाई—खुदावंत साहेब, आपल्या सेनापतींनीं त्यावेळीं रजपूत सैन्यावर असा दाब बसविला कीं, तें कांहीं एक हालचाल करीनासें झालें. यावेळीं थोडीशीं रात्र शिलक होती, सबब आह्मी तेथें पहारा करीत उजाडेपर्यंत राहिलों. उजाडल्यावर राजकन्येसह कुच केले. डोंगर उतरून सपाट मैदानावर आल्याबरोबर एक जंगी वायधूळ उठली; ह्मणून आह्मी तेथें क्षणमात्र थांबलों, तोंच समोरून एक रजपूत सैन्य आह्मांवर चाल करून आलें. त्या सैन्याचे सरदारानें राजकन्येस आपले ताब्यांत मागितलें. आह्मी इनकार केला; त्याबरोबर दोन्ही सैन्यांत तुमुल युद्ध झालें; रजपूत सैन्यास आह्मी बहुत वेळ मागें हटविले; पण आह्मी पायदळ व ते स्वार असलेमुळें आमचा पराक्रम व्यर्थ होण्याच्या बेतांत आला, तरी आह्मी लढण्यास कमी केलें नाहीं. सेनापती साहेब तर हातांत तरवार घेऊन रजपूत सैन्यांत घुसले; तेव्हां त्यांनीं सेनापतीसाहेबास वेढा दिला. आह्मीं लढण्याची शिकस्तच केली; पण व्यर्थ ! ! लढतां लढतां आपले सर्व लोक धारातीर्थीं मरून पडले. आह्मी २।४ असामी मात्र ती बातमी स्वामीचरणापाशीं विदित करण्यास मोठ्या शर्तीनें बचावलों

बादशाहा—ते लोक कोण होते, हें तुला सांगतां येईल काय ?

शिपाई—त्या सैन्याचा नायक कोणी रजपूत तरूण पुरूष आहे, असें ऐकिलें; यापेक्षां जास्त खुलासा कळला नाहीं. कळावा कसा ? आमची व त्यांची हल्लभेट झाल्याबरोबर लढाईसच सुरवात झाली.

अशा तऱ्हेचें वर्तमान ऐकत असतां बादशाहाच्या चेहेऱ्यांत क्षणोक्षणीं होणारा फेरबदल मोठा पहाण्यासारखा होता. त्याचा चेहरा अगदीं संतप्त झाला, नेत्र आरक्त झाले, त्वेषानें रोमांच थरारून उभारले, ओंठ थरथर कापूं लागले, अशा स्थितींत बादशहाचे मनांत नानाप्रकारचे विचार खेळूं लागले. तो कधीं जमिनीकडे एकसारखी नदर लावी व कधीं एकसारखा आकाशाकडेच पहात राही. अशा स्थितींत बादशाहा एकदम उठून उभा राहिला व रतनसिंहाला दरबारांत हजर करण्याचा हुकूम देऊन चालता झाला.

---

## सातवा परिच्छेद.

बादशाहा एका रत्नजडीत सिंहासनावर दरबारांत बसला असून त्याचे ८।१० प्रधान आपापल्या जागेवर बसले आहेत व रतनसिंहासंबंधीं चर्चा करीत आहेत, तों चोपदारानें तेथें येऊन रतनसिंहाला आणिला असल्याबद्दल वर्दी पोचविली. बादशाहानें हुकुम केल्याबरोबर रतनसिंहाला चोपदारानें दरबारांत आणून हजर केला. बादशाहानें त्याचा सलाम घेऊन त्यास बसण्यास जागा दिली. रतनसिंहाचें वय या वेळीं ५० वर्षाचें होतें. रतनसिंह हा जरी वृद्धावस्थेंत जाऊं पहात होता, व सध्यां तो बादशाहाच्या कैदेंत होता, तरी त्याचें राजतेज झांकत नव्हतें. त्याचा या वेळचा पोषाक अगदीं साध्या तऱ्हेचा होता व यावेळीं त्याजजवळ शस्त्रही नव्हतें, तरी त्याचें शौर्य झळकत होतें. रतनसिंह, बादशाहाची आज्ञा मिळाल्यावर दाखविलेल्या जागेवर वीरासन ठोकून बसला. त्याला पाहिल्याबरोबर दरबारी मंडळींनीं मोठ्यानें बोलण्याचें बंद करून ते एकमेकांच्या कानाशीं लागूं लागले. कोणी बोलत नाहीं, अशी कांहीं वेळ वाट पाहून रतनसिंह पुढें सरसावून ह्मणाला, " काय हुकूम आहे ? व मला बोलावण्याचा हेतू काय ? " बादशाहा ह्मणाला— " आज इतक्या दिवसांत मीं

विचारलेल्या प्रश्नांचा आपण विचार केला काय ? मला उमेद वाटते कीं, आपण माझ्या ह्मणण्यास रुकार द्याल." रतनसिंहानें पुन्हां जबाब दिला कीं, "मीं आपलें ह्मणणें पूर्वींच खाविंदास कळविलें आहे व आजही पुन्हां कळवितों कीं, परमेश्वरानें आपणांस बादशाही पद दिलें आहे, तें न्यायानें वागण्याकरितां होय; तर दुर्बलांचें रक्षण करून दुष्टांचा नाश करावा, हें आपणास उचित आहे." हें भाषण ऐकिल्यावर बादशाहा भिंवया चढवून ह्मणाला— "तुह्मी माझ्या ह्मणण्याचा अद्यापि पुरतेपणीं विचार केला नाहीं, असें दिसतें. नाहीं तर आपण असें उत्तर अद्यापिही देताना ! ! मी आज तुह्माला पुन्हां सांगतों कीं, तुह्माला घर सोडून बरेच दिवस झाले व विनाकारण तुह्मी कष्ट सोशीत आहात, तर आज तरी तुह्मी या गोष्टीचा निकाल लावाल, अशी मी आशा करितों.

**रतनसिंह**—लढाईंत मरून जाणें, पराकाष्ठेचें साहस करणें, अप्रतिम शौर्य दाखविणें, लढाईंतून पळून न जाणें, शरणागताचें रक्षण करणें, व एकवचनीं राहणें, या गोष्टी जशा क्षत्रियांना अवश्यक सांगितल्या आहेत, त्याचप्रमाणें आपलें कुल निष्कलंक राखण्याबद्दल प्रयत्न करणें क्षत्रियाचें मुख्य कर्तव्य आहे.

**बादशाहा**—तुह्मी माझ्या ह्मणण्यावर वादविवाद करूं इच्छिता काय ?

**रतनसिंह**—खाविंदांनीं माझ्या बोलण्याचा भलताच अर्थ समजून घेऊं नये व मला दृढ आशा आहे कीं, खाविंद अन्याय करणार नाहींत.

**बादशाहा**—( थोडावेळ थांबून ) आपण या गोष्टीचा निकाल लवकर न कराल तर आपणाला यापेक्षांही जास्त दुःखें सोसावीं लागतील व कदाचित् आपण प्राणालाही मुकाल; ह्मणून या गोष्टीसंबंधानें पुन्हां एकदां चांगला शांतपणानें विचार करण्याकरितां मी आणखी एक महिन्याची तुह्माला मुदत देतों; तेवढ्या अवकाशांत विचार करून माझ्या ह्मणण्यास मान्य व्हा.

हें भाषण ऐकिल्यावर रतनसिंह बादशाहाला सलाम करून व त्याचा

हुकुम घेऊन निघून गेला; नंतर बादशाहा आपल्या प्रधान मंडळाला म्हणाला—"रतनसिंहाला अद्यापि गृहवियोगाशिवाय अन्य त्रास झाला नाहीं; म्हणून मला वाटतें कीं, जोंपर्यंत आपण याला जास्त त्रास दिला नाहीं, तोंपर्यंत तो आपल्या म्हणण्यास रुकार देणार नाहीं." प्रधानमंडळांपैकीं एकजण म्हणाला, "त्रास इतका बलवान् आहे कीं, तो वाघालाही शेळी-प्रमाणें गरीब करून टाकतो." यावर बादशाहा म्हणाला—"तुरुंगावरील अधिकाऱ्याला रतनसिंहास इतर कैद्यांपेक्षांही जास्त त्रास देण्याबद्दल सांगावे व मंडलगडाकडे जयेचा शोध करण्यास पुन्हां सैन्य पाठवावें." असा हुकुम करून बादशाहानें दरबार खलास केला.

---

# आठवा परिच्छेद.

जैसलमिरामध्यें बलभद्रसिंह नांवाचा एक राजा राज्य करीत होता व हा राजा रतनसिंह यांचा भाऊ होय. या उभयतांचें बंधुप्रेम इतकें होतें कीं, सहोदर बंधूंमध्यें असें प्रेम क्वचितच आढळतें. रतनसिंह हा सहपरिवार जैसलमिरास जाऊन रहात असे व बलभद्रसिंहही मंडलगडास जाऊन बहुत दिवस मुकाम करी. या दोन बंधूंमध्यें जसें प्रेम होतें, तसेंच प्रेम त्या दोघांच्या स्त्रियांमध्येंही होतें.

बलभद्रसिंहाला कांहीं संतति नव्हती; फक्त रतनसिंहाला मात्र एक कन्या होती व तीच आमच्या या पुस्तकांतील नायिका होय. जया चार-पांच वर्षांची असतांना तिची आई इतकी रोगग्रस्त झाली कीं, दिवसेंदिवस तिची शक्ती क्षीण होऊन ती मृत्युपंथास लागली; तेव्हां तिनें बलभद्रसिंहाचे स्त्रीस बोलावणें पाठविलें व अंतकाळीं जयेला तिचे पदरांत टाकून म्हणाली—"बाई, इचें तुम्ही आतां आपल्या कन्येप्रमाणें पालनपोषण करा. मीं तर आतां चाललेंच; ही जर जिवंत राहिली तर माझी निशाणी

राहील व इजला पाहून माझी तुह्माला वारंवार अठवण होईल." बल-भद्रसिंहाच्या स्त्रीनें जयेचें लालनपालन तिच्या आईप्रमाणेंच केलें; परंतु दुर्दैवानें जया दहा अकरा वर्षांची झाली नाहीं तोंच बलभद्रसिंहाची स्त्रीही परलोकवासी झाली. त्यानंतर कांहीं दिवसांनीं राजा रतनसिंहानें जयेला मंडलगडास आणिली व तेव्हांपासून ती आपल्या बापाजवळच रहात असे. इकडे बलभद्रसिंहानें आपला दुसरा विवाह केला; पण तेव्हांपासून जया जैसलमिरास कधींच गेली नव्हती. जेव्हां बलभद्रसिंहानें ऐकिलें कीं, दिल्लीचा बादशाहा अल्लाउद्दीन हा जयेचे सुस्वरूपावर मोहून गेला आहे व त्यानें तिची प्राप्ती होण्याकरितां रतनसिंहाला कैद केला आहे आणि जया मंडलगडास एकटी आहे, तेव्हां त्यानें आपल्या सेनापतीस तिला आणण्याकरितां पाठविलें. नंतर वाटेंत सेनापतीची व तिची गांठ पडून ती जैसलमिरास कशी येऊन पोंचली, हें वाचकांस विदित आहेच.

जयेला आपल्या चुलत्याचे घरीं येऊन फार दिवस झाले नाहींत तोंच बिकानेरचा राजकुमार सुचेतसिंह, बलभद्रसिंहाची स्त्री वसंतकुमारी इचा भाऊ, कांहीं कामानिमित्त जैसलमिरास आला व तो जयेचें स्वरूप पाहून मोहीत झाला. एक दिवस बोलतां बोलतां तो आपल्या बहिणीस ह्मणाला—" दिल्लीचा बादशाहा अल्लाउद्दीन हा जयेवर मोहीत झाला आहे व तिच्या प्राप्तीकरितां त्यानें तिच्या बापासही कैदेंत टाकलें आहे, व तो हिच्या शोधाकरितां अनेक यत्नही करीत आहे, ही गोष्ट तुला माहीत नाहीं काय ? जर बादशाहाला कळलें कीं, बलभद्रसिंहानें तिला आपल्या घरीं छपवून ठेविलें आहे, तर तुमची काय दशा होईल याची कल्पना तरी तुह्मी केली आहे काय ? बादशाही सैन्य तुह्मावर चालून आल्यास त्यास तोंड देण्याची शक्ती तुह्माज-वळ आहे काय ? तुह्मी ही गोष्ट चांगली केली नाहीं, तरी अद्यापिही कांहीं बिघडलें नाहीं. बादशाहाला राग येणार नाहीं, असें अजूनही करतां येईल व तें तुह्मी होईल तितके लवकर करावें. "

या गोष्टी ऐकून वसंतकुमारीचें तोंड अगदीं उतरून गेलें व ती आपल्या

भावास ह्मणाली:— " दादा, चांगले वेळेवर सावध केलेस. मी तिकडे बोलावून सांगतें कीं, जयेला कोणत्या तरी कारणानें येथून पाठवून द्यावी. पण अशा स्थितींत तिला पाठवावी तरी कोठें ? एक तर ती तिकडची प्रत्यक्ष पुतणी आहे; दुसरे ती लहानपणापासून इकडेच होती; तिसरे, तिला जर येथून पाठविलें, तर लोकापवाद मजवर येईल. तेव्हां आतां करावें तरी काय बरें दादा ? " यावर वसंतकुमारीची दासी जमना ह्मणाली— " दादासाहेबांबरोबरच जयेचा विवाह करून द्यावा व तें कार्य येथेंच गुप्तपणें उरकून घ्यावें, ह्मणजे बादशाहालाही पत्ता लागणार नाहीं, व तिला येथून दुसरीकडे पाठविल्याबद्दल लोकांचा अपवादही आपल्यावर येणार नाहीं. बाईसाहेब, असें नाहीं कां होणार ! " यावर वसंतकुमारी हंसत हंसत ह्मणाली— "तूं युक्ती तर ठीक काढलीस. जयेला असा सुंदर नवरा मिळणें कठीण आहे." हें ऐकून सुचेतसिंह मोठ्या डौलानें ह्मणाला—" जर माझ्या योगानें तुमचें संकट दूर होण्यासारखें असलें तर माझी त्यास नाकबुली नाहीं; परंतु माझें ह्मणणें इतकेंच कीं, जें करणें तें फारच जलद केलें पाहिजे. कारण ही भीति सामान्य नव्हे. जया जैसलमिरास आहे, अशी बातमी बादशाहाला लागल्याबरोबर महाराजांना दिल्लीस बोलावणें होईल व नंतर बादशाहा काय करील आणि काय नाहीं, याचा कांहींच अदमास करतां येत नाहीं. मग तुमचे आमचे बेत सर्वच जागच्या जागीं राहतील, ह्मणून ह्मणतों कीं, जें करणें तें लवकरच केलें पाहिजे. "

इतकें बोलून सुचेतसिंह निघून गेला. राणीला मात्र राहवेना, तेव्हां तिनें बलभद्रसिंहास ताबडतोब येऊन जाण्याबद्दल दासीबरोबर निरोप पाठविला.

---

# नववा परिच्छेद.

बादशहानें राजा रतनसिंहाला जेव्हां कैदेंत ठेवलें, तेव्हां त्याला कसल्याही प्रकारचा शारीरिक त्रास नव्हता; फक्त मानसिक त्रास मात्र होता; परंतु रतनसिंहाला दरबारांत बोलावून जेव्हां जयेला आपल्या स्वाधीन करण्याबद्दल बादशहानें सांगितलें व रतनसिंहानें तें नाकबूल केले, तेव्हांपासून बादशहाच्या मनानें पक्के घेतलें कीं, रतनसिंहाचा छल केल्याशिवाय तो आपल्या ह्मणण्यास मान देणार नाहीं. व त्याप्रमाणें बादशाही कैदेंत रतनसिंहाला मनस्वी कष्ट सोसावे लागले.

प्रथमतः तुरुंगावरील अधिकाऱ्यानें त्याला तुरुंगांतून काढून दुसऱ्या ठिकाणीं नेलें. तें स्थल फारच भयंकर होतें. एका मोठ्या थोरल्या वाड्याचें तें तळघर होतें. तेथें मध्यान्हींचे सूर्याचा प्रकाशही क्वचित् येत असे व हवा खेळण्यासही तेथें पुरेशी जागा नव्हती. ती जागा अतिशय संकोचित असून तेथें निजण्याकरितां एक फाटकेसें तरट, एक पाण्याचें भांडें व जेवायास एक लहानसेंच ताट होतें. रात्रंदिवस तेथें एकटे पडून राहण्याशिवाय रतनसिंहाला दुसरें काम तें काय असणार ? फक्त अन्न घेऊन जो मनुष्य येत असे, तो क्षणभर बसून त्यास उपदेश करी कीं, "जर तूं बादशहाबरोबर आपल्या मुलीचें लग्न केलेंस, तर तुझ्यासारखा मानमरातब कोणाचाच राहणार नाहीं व मग तुझ्या कन्येच्या सुखासही पारावार नाहीं. आज बादशहा सामोपचारानेंच तुझी मुलगी मागत आहे, तोंच देऊन टाक; नाहींतर बळजबरीनें तो तुझ्या मुलीला आपलीशीं करील आणि मग तुला पश्चात्ताप होईल; तर त्याचा काय उपयोग ?" अशा अर्थाचें भाषण करून तो परत जाई; व मग दुसरे दिवसापर्यंत त्याला मनुष्य दृष्टीसही पडत नसे. वाचकहो, विचार करा कीं, अशा स्थितीत रतनसिंहाच्या शरीराला व मनाला किती कष्ट सोसावे लागत असतील.

या भयंकर कैदखान्यांत येऊन पडल्यावर पहिले दोनचार दिवस रतन-

सिंहास अन्नपाणीही गोड लागलें नाहीं. परमेश्वराची काय विचित्र माया आहे कीं, या देहाला जितकें सुख मिळेल, तितकी सुखाची आकांक्षा वाढत जाऊन वर्तमानस्थिति त्यास कष्टमय वाटते, व जेव्हां देहाला कष्ट होऊं लागतात, तेव्हां तेही दिवस सुखाचे काळाप्रमाणेंच त्याला कंठावे लागतात. भेद इतकाच कीं, सुखाचे दिवस जाण्यास विलंब लागत नाहीं व दुःखाचे दिवस जातां जात नाहींत. दोनचार दिवस गेल्यावर रतनसिंह तें तुरुंगांतील जड अन्नपाणी जीवसंरक्षणार्थ खाऊं लागला, पण त्याच्या नाजुक व वृद्ध प्रकृतीला तें मानवलें नाहीं. त्यानें तें अन्न खाऊनच दोन-चार दिवस ढकलले; पण दिवसेंदिवस त्याची प्रकृति बिघडत चालली; व रात्रंदिवस त्याला आपल्या पूर्व स्थितीचें स्मरण होऊन त्यास फारच त्रास व कष्ट होऊं लागले.

रतनसिंह तुरुंगांतून पळून जाण्याची संधी पाहूं लागला; पण पळून गेल्या-वर आपल्याला पाठबळ नाहीं, असें त्याच्या लक्षांत आलें; ह्मणजे त्याची कंबर मोडून जाई. कधीं कधीं आत्महत्या करण्याचेही त्याच्या मनांत येई, पण भावी आशेवर तो विचार त्याचे मनांतून नाहींसा होई. दुसरे, प्राणासारखी प्रिय वस्तु मनुष्यमात्राला या जगांत दुसरी नाहीं; तेव्हां आपल्या हातानें आपला घात करून घेण्यास समूळ निराशेशिवाय कोणाचेंही धाडस होत नाहीं. केव्हां त्याला असें वाटे कीं, हेच दिवस सदोदित राहतील असें नाहीं. माझी ही साडेसाती सरल्यावर मला खचित् सुदिन दिसतील. पर-मेश्वराची गैरमर्जीच जर मजवर झाली असेल, तर मी कोण व माझें चाल-णार तरी काय ? परमेश्वरानें मला राजघराण्यांत जन्मास घातलें आहे व सर्व प्रकारें मला सुख दिलें आहे. यावेळीं जें हें मला दुःख होत आहे, तें माझ्या पूर्वजन्मीच्या पापामुळें होय. असेंही केव्हां केव्हां त्याच्या मनांत आल्यावांचून राहिलें नाहीं कीं, बादशहाचें ह्मणणें मी मान्य केल्यास पूर्वी पेक्षांही जास्त सुख मला मिळेल. आज जो सगळ्या भरतखंडाचा धनी आहे व हजारों मांडलीक राजे ज्याच्या हाताखालीं आहेत, अशाशीं स्पर्धा

करून माझें काय चालणार ? श्रीमद्भगवद्गीतेमध्यें स्वतः श्रीकृष्णांनींच ह्मटलें आहे कीं, " नारायणाच्च नराधिप " शिवाय ' ना विष्णुः पृथिवी-पतिः ' असेंही ह्मटलें आहे, तेव्हां हिंदु व मुसलमान हा भेदाभेद कसला मानावयाचा ?

जगतामध्यें लोकाचार शास्त्रापेक्षां बलवत्तर मानला जातो. " यद्यपि शुद्धं लोकविरुद्धं नाकरणीयम् नाचरणीयम् " हें जरी खरें आहे, तरी याचा विचार केला पाहिजे कीं, जर मी बादशाहास कन्यादान केलें, तर बादशाहाची मजवर बहाल मर्जी होऊन माझा मानमरातबही मोठा होईल; पण लोक माझी निंदा करतील. तोंडावर करणार नाहींत, मागें करतील. पाठीमागें कोणकोणाची निंदा करीत नाहीं. अशी ह्मण आहे कीं, धना-च्या बलानें ' अकुलीनो कुलीन स्यात्, ' माझें यांत कांहीं बिघडणार नाहीं; उलट पहिल्यापेक्षां माझी प्रतिष्ठा वाढेल. या जगतामध्यें असें कोणतें कुल आहे कीं, ज्याला कांहींच लांछन लागलेलें नाहीं. कोणी एका महा त्म्यानें ह्मटलें आहे:— " कानीनस्य मुनेः स्वबांधववधू वैदुभ्य विध्वंसिनौ, नातारः खलु गोलकस्य तनयाः कुण्डाः स्वयं पाण्डवाः । तेभी पंच समान योनि रतयः तेषां गुणोत्कीर्तनात् । अक्षय्यं सुकृतं भवेद विकलं धर्मस्य सूक्ष्मागतिः ॥

समजा, बादशाहाशीं सोयेरसंबंध केल्यामुळें मला जातीनें बहिष्कार घातला, पण तसें केल्यानें बादशाहावर माझें वजन राहील आणि बादशा-हावर उपकार केल्यासारखें होईल. धन आणि शक्ति यांजपुढें सगळ्यांना हार खावी लागेल. आज लोक मला कुलकलंकी ह्मणून माझा तिरस्कार करतील, पण जेव्हां माझ्या हातीं सत्ता येईल, अलोट संपत्तीचा मी मालक बनेन व बादशाहाकडे जावयाच्या शिफारशी माझ्या मार्फत जाऊं लाग-तील, तेव्हां बिशाद काय लोक माझी निंदा करतील. मीच मग लोकांना तुच्छ मानीन व माझ्याशीं स्नेह करण्यांत लोकांना धन्यता वाटेल. त्यावेळीं मला वाईट ह्मणण्याची कोणाची छाति आहे ? परमेश्वरकृपेनें जया

ज्याप्रमाणें सुस्वरूप आहे, त्याचप्रमाणें ती सुगुणीही आहे. लहानपणीं तिची आई मेली; तेव्हांपासून मीं तिचें लालनपालन करण्यांत किती कष्ट सोसले व तिचे लाड कसे पुरवले, हें माझे मलाच माहीत. जेव्हां तिला मी सुखी झालेली पाहीन, तेव्हां माझ्या आनंदास पारावार राहणार नाहीं. कन्येला सुस्थळीं देणें हा पित्याचा धर्म आहे. मग बादशाहापेक्षां अधिक चांगलें स्थळ तिला कोठून मिळणार ? या सर्व गोष्टी खऱ्या आहेत, पण जातीला व कुलाला बट्टा लागेल, त्याची वाट काय ? एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, ' यद्दी वरे भवेत् दोषः किंधनेन कुलेन किं। "परंतु याच्याही पुढची एक गोष्ट आहे कीं, मी आपली कन्या हट्टानें बादशाहाला दिली नाहीं; आणि बादशाहानें तिला बलात्कारानें आणिली व तशी तो आणणारही आहे; मग पुढें काय करावें ? अथवा यासंबंधानें आपल्या कन्येचें मत काय आहे ? याची आधीं चवकशी केली पाहिजे. जर ती या गोष्टीस मान्य झाली, तर ठीकच आहे; नाहींतर मात्र कठीण अवस्था आहे. पण ती नाकबूल कां म्हणून होईल ? अल्लाउद्दीन बादशाहाला धन, रूप, यौवन, सत्ता व प्रेम इत्यादि सर्व गोष्टी अनुकूल आहेत व प्रायः याच गुणांवर स्त्रिया लुब्ध होतात. प्रेम ही एक अशी अमोलिक चीज आहे कीं, स्त्री पुरुषांना वश करण्यास हें एक जणूं शस्त्रच आहे. आतां संशय इतकाच राहिला कीं, परवां जेव्हां तो मनुष्य माझ्याकरितां अन्न घेऊन आला होता आणि त्याचे तोंडून सरफराजखां व जया यांचे संबंधानें हकीकत ऐकिली, त्यावरून असें वाटतें कीं, जया ही वीरसिंहावर अनुरक्त झाली आहे व त्यांत कांहीं आश्चर्यही नाहीं. कारण तिच्या हृदयामध्यें तो प्रेमांकुर आज बरेच दिवसापासून आहे. दुसरें, आतां तर तिनें त्याला प्रत्यक्ष पाहिलें आहे. तिसरें, त्याच्या प्रेमपूर्ण उपकारामुळें तिच्या हृदयांतील त्याचेसंबंधीं प्रेम थोडेंना थोडें तरी वाढलें असलें पाहिजे. शिवाय ही गोष्ट तर सिद्ध आहे कीं, आर्यकुलललनांना पातिव्रत्य धर्मापुढें त्रिभुवनांतील सुखही तुच्छ वाटतें. ज्या कुलामध्यें अशा स्त्रिया उत्पन्न होतात, त्यांची धन्यता काय वर्णन करावी ?

अशा प्रकारचे उद्गार त्याच्या तोंडांतून निघत असतां एकदम त्याच्या तोंडावर कांहीं निराळ्याच तऱ्हेची झांक दिसूं लागली. त्याचे नेत्र पाण्यानें भरून आले, सर्व शरीरावर थरारून रोमांच उभे राहिले, अंगाला घाम सुटला, तो थरथर कापूं लागला व अखेर एक मोठा उसासा टाकून तो जमीनीवर धाडकन् मूर्च्छा येऊन पडला. कांहीं वेळानें सावध होऊन तो ह्मणूं लागला—" धिःकार असो मला व माझ्या जीविताला !! क्षत्रियकुलांत जन्म घेतलेल्या मला धिःकार असो ! ! ! क्षत्रिय कुलामध्यें मी केवळ कुलांगारच निपजलों ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. स्वप्नवत् आत्मसुखाकरितां माझ्या मनांत असे निंद्य विचार यावे काय ? व सर्व जन्मांत एकदां तरी माझें जात्याभिमानाचें वारें निघून जावें काय ? ज्या दुष्ट जिव्हेनें असे नीचतर शब्द उच्चारिले तिचे तुकडे तुकडे करून कां न टाकावेत ? मी असा अभिमानभ्रष्ट कां झालों ? काय ? माझ्या शरीरांतील क्षत्रियाचें रक्त अगदीं नाहींसें झालें ? अथवा त्या रक्तांत कांहीं दोष उत्पन्न झाला ? बरोबर आहे. शास्त्रांत ह्मटलें आहे कीं, " यादृशं भक्षयेदन्नं बुद्धिर्भवति तादृशी " इतके दिवस मीं जें हें यवनांचें अन्न खाल्लें, त्याचमुळें माझ्या बुद्धीस हा भ्रंश झाला आहे, यांत संशय नाहीं. नाहींतर असें उद्गार माझ्या तोंडांतून निघाले नसते इतकेंच नव्हें, तर तसे विचारही माझ्या मनांत येतेना ! ! धिःकार असो मला !!! " असा आपला धिःकार करून घेत असतांच रतनसिंह त्या भयंकर तुरुंगांत स्वस्थ पडून राहिला.

---

## दहावा परिच्छेद.

वसंतकुमारी—जयेला आपण येथें बोलावून आणून ठेवलें, हें बरें केलें नाहीं. मीं असें ऐकिलें आहे कीं, दिल्लीचा बादशाहा अल्लाउद्दीन हा तिच्यावर लुब्ध झाला आहे व याचकरितां त्यानें भावोजींना

कैदेंत टाकलें आहे. जयेला आणण्याकरितां त्यानें फौज पाठविली होती, पण वाटेंतच पृथ्वीसिंहाच्या मुलानें तिला सोडविली व आपण तिला येथें आणली; पण बादशाहाला हें समजलें तर त्याच्याशीं आपलें वैर वाढेल. आपण तिला येथें आणून ठेवून निश्चिंत झाला आहांत; पण माझें रक्त आटत चाललें आहे; तेव्हां आपण पुढें काय विचार केला आहांत ?

**बलभद्रसिंह**—मला याच गोष्टीची रात्रंदिवस चिंता लागली आहे. कारण मदांध अल्लाउद्दीन जयेवर फारच आसक्त झाला आहे. रतनसिंहाचें व बादशाहाचेंही या बाबतींत कांही बोलणें झालें; पण त्याचा परिणाम असा झाल्याचें ऐकितों कीं, तो दादांना फारच त्रास देऊं लागला आहे. जयेला आणण्याकरितां त्यानें जी फौज पाठविली होती, तिचा पराभव वीरसिंहानें केला, अजितसिंहही त्याचवेळीं तेथें जाऊन पोंचला होता; पण सुदैवाची गोष्ट कीं, त्याला त्या युद्धांत सामील होण्याची बुद्धी न होतां तो परस्पर जयेला घेऊन इकडे आला. जया तर येथें येऊन पोंचलीच, पण बादशाहाला हें कळल्यास आपणास मोठा उपद्रव होईल. त्या कामांधाला यावेळीं लाज अथवा धर्म यांपैकीं कशाचीही पर्वा नाहीं. बादशाहा हा जातीचाच हट्टी आहे व आतां तर कामांधतेमुळें तो फारच हट्टी झाला आहे. जेव्हां दादावर प्रसंग गुजरला, तेव्हां जर मी जयेला बोलावणें पाठविलें नसतें, तर जग ह्मणतें कीं, या दोन्ही भावांचें प्रेम अतिशय होतें, पण प्रसंगीं मी त्या अनाथ मुलीचाही समाचार घेतला नाहीं. दुसरें, जयेचा जन्म मात्र मंढलगढास झाला; बाकी ती बहुत दिवस मजजवळच होती; ह्मणून तिच्यावर माझें फार प्रेम जडलें आहे. परंतु हा समय मोठा कठीण येऊन पोंचला आहे.

**वसंतकु०**— मला वाटतें कीं, तिचें लग्न करून टाकलें तर फार उत्तम होईल.

**बल०**— साखरपुडा तर झालाच आहे. बरें तर मी आतांच पृथ्वीसिंहाला पत्र लिहून त्यांचें ह्मणणें काय आहे, त्याचा जबाब मागवितों.

**वसंतकु०**— मला मात्र हें कबुल नाहीं.

बल०— कां बरें ?

वसंतकु०—अजमिराहून येथें वरात आणावयाची; ह्मणजे ही गोष्ट बादशाहाला कळणार नाहीं कां ? व कळलें तर जास्तच वैरभाव वाढेल!

बल०— मग काय करावयाचें ह्मणतेस ?

वसंतकु०— मला तर असें वाटतें कीं, सुचेतसिंहालाच जया द्यावी. ह्मणजे ही गोष्ट कळणारही नाहीं, खर्चही जास्त लागावयाचा नाहीं व जया अमुक ठिकाणीं आहे, हें बादशाहाला तर मुळींच समजणार नाहीं.

बलभद्रसिंह—तूं ह्मणतेस ती गोष्ट खरी. पण जयेचा लग्ननिश्चय एके ठिकाणीं झाला आहे; तेव्हां आतां तो मोडून दुसरीकडे लग्ननिश्चय करणें अधर्म आहे. शिवाय तो निश्चय दादांनींच कायम केला आहे. तेव्हां मी तो कसा तोडावा ?

वसंतकु०—या गोष्टीचा विचार करण्याची ही वेळ नव्हे. संसारामध्यें या अशा गोष्टी घडावयाच्याच ! आतां माझ्या भावाशीं तिचें लग्न आपणास कर्तव्य नसल्यास आपली मर्जी !! ( दासीजवळ ) ऐकलेंस जमने, मी तुला पूर्वींच ह्मटलें होतें कीं, माझी गोष्ट कोणी ऐकायचें नाहीं ह्मणून ? घरचा विचार कोणालाच पसंत पडायचा नाहीं. बाहेरचे लोक ह्मणतील तें मात्र व्हावयाचें. माझ्या मनांत ही गोष्ट इकडे काढावयाचीच नव्हती, पण तुझे ऐकून मी आपला मात्र व्यर्थ अपमान करून घेतला. भावोजी मात्र कायते परमेश्वर ? माझा भाऊ कोणत्या झाडाचा पाला ! त्याचें लग्न केव्हांही होईलच. जया त्याला मिळाली नाहीं, ह्मणून त्याचें लग्न राहतें, असें थोडेंच आहे ? शिवाय तो कधीं या गोष्टीला कबूल आहे ? मी खटपट करून त्याला मोठ्या मुष्किलीनें कबूल केला; तो त्याचा परिणाम हा असा झाला पाहिलासना जमने ? मीं आजच्या आज त्याला घेऊन माहेरी जाते व त्याचें लग्न सर्वांच्या देखत करून टाकते.

बल०—परमेश्वरानें स्त्रियांची बुद्धी कशी बनविली आहे कोण जाणे ? यांच्या हट्टापुढें विचारशक्तीचें काम तर बिलकुल चालतच नाहीं. मी असें

कधीं म्हटलें होतें कीं, तुझा भाऊ झाडाचा पाला व त्याचें लग्न होणार नाहीं म्हणून ! कशास कांहीं संबंध तरी ! स्त्रियांच्या बुद्धीची तरीं कमाल असो बोवा !

वसंतकु०—पण ही गोष्ट बोलण्याचें तरी मला काय कारण पडलें होते ! चुकलें बरें मी. मला जें सांगायचें होतें, तें मीं सांगितलें. आतां आपल्याला वाटेल तसें आपण करावें व मला वाटेल तें मी करीन. तुम्हाला लोक हंसणार नाहींत व भावोजींनाही कोणी वाईट म्हणणार नाहीं, असें करायचें होतें म्हणजे झालें ? देवा, कायरे माझ्या बुद्धीस यावेळीं हा भ्रंश पडला.

बल०-असो, तुझी जर अशी इच्छा असेल, तर मी आतांचे आतां धनीरामजीस बोलावून विवाहाचा दिवस ठरवितों. तुम्ही आपली तयारी करा.

---

# अकरावा परिच्छेद

आरसे महालामध्यें जया काकांचे प्रदोषपूजेकरितां जाईच्या फुलांचा हार गुंफीत असतां घाबऱ्या घाबऱ्या तिची सखी किशोरी तेथें येऊन पोंचली व मोठ्या उदासीनतेनें म्हणाली—"बाईसाहेब, तुम्ही तर येथें निश्चिंतपणें बसल्या आहांत; पण तिकडे तुमच्यासंबंधानें मोठमोठ्या मसलती चालल्या आहेत, समजलें कां ? "

जया— ( घाबरून ) काय म्हणतेस ! माझ्या संबंधानें मसलती ! कशाच्या ? व कोण करीत आहेत ?

किशोरी—बाईसाहेब, तुम्हाला सांगितल्यास तुमचें दुःख जास्तच दुणावेल.

जया— सखे, विलंब न करतां लवकर काय तें सांग. दुःख सोसून सोसून माझें मन आतां घट्ट झालें आहे.

किशोरी— आज तुमची काकू काकासाहेबांचे जवळ हट्ट घेऊन

बसली आहे कीं, जयेचें लग्न सुचेतसिंहाबरोबर करून द्यावें. प्रथमतः काकासाहेब त्याला कबूल नव्हते, परंतु जेव्हां काकूसाहेबांची स्वारी खूपच संतापली, तेव्हां निरुपायानें काकासाहेबांनीं त्यांचें बोलणें कबूल केलें व लग्नाचा मुहूर्तही ठरविण्याचा निश्चय झाला.

हें ऐकल्याबरोबर जयेच्या हातांतील ती पुष्पमाला गळून पडली व तिच्या नेत्रांतून टपटप अश्रु गळूं लागले. जयेची ही अवस्था पाहून किशोरीनें अनेक प्रकारें तिचें सांत्वन केलें. ती ह्मणाली—" बाईसाहेब, ही वेळ अधीर होण्याची नाहीं. धीर धरा. जर धीर सोडलात, तर आपल्या कळवळ्याचें एकही मनुष्य येथें नाहीं; तर दुःख गिळून या संकटांतून सुटण्याचा उपाय शोधला पाहिजे." यावर एक दीर्घ श्वास सोडून जया ह्मणाली कीं, "खचित् परमेश्वराचा मजवर कांहीं तरी कोप झाला आहे. मी परमेश्वराला दृढ भावानें शरण जातें, तरी माझ्यावर तो कृपादृष्टी करीत नाहीं. आतां काय करूं ?"

**किशोरी** — माझ्या बुद्धीला असें वाटतें कीं, आपण एक पत्र वीरसिंह महाराजांना लिहून त्यांत इकडली सर्व हकीकत खुलासेवार रीतीनें लिहावी. मला पूर्ण भरंवसा वाटतो कीं, तो वीर क्षत्रिय तुमची चिंता खचित खचित् दूर करील, यांत संशय नाहीं.

**जया**—सखे, मी त्यांना पत्र कसें लिहूं व काय लिहूं. मला फारच लाज वाटते. मी जर त्यांना पत्र लिहिलें तर ते काय ह्मणतील ?

**किशोरी**—त्यांत लाज कसली आहे ? निदान अशा प्रसंगीं तरी लाज-बिज धरून कांहीं उपयोग नाहीं.

**जया**—पण पत्र घेऊन त्यांजकडे कोण जाणार ?

**किशोरी**—आपण पत्र लिहावें तर खरें. मी डुंगररामाचे हातीं तें पाठवून देण्याची व्यवस्था करिते.

असें बोलून किशोरीनें दौत, कलम व कागद जयेचे पुढें आणून ठेवलाच. जया पत्र लिहावयाला बसली; परंतु यावेळीं तिची अवस्था कांहीं विचित्रच होत होती. प्रथमतः बराच वेळ नुसत्या विचारांतच गेला. पुढें

एक दोन ओळी लिहिल्या, तोंच तिला काय वाटलें कोण जाणें ! तो कागद तिनें फाडून टाकला व दुसरा घेतला. पुन्हां लिहिण्यास सुरवात केली. एक अक्षर लिहावें, पुन्हा शाई घ्यावी, पुन्हां विचार करावा, पुन्हां शाई घेतल्यासारखे करावे, असें करतां करतां तें अर्धेमुर्धे लिहिलेलें दुसरें पत्रही तिनें फाडून टाकलें. अखेर तिनें बऱ्याच वेळानें तिसरें पत्र पुरें केलें, त्यांत पुढील मजकूर होता:—

"पुराणांतरची कथा मीं ऐकिली आहे कीं, श्रीकृष्णभगवानांनीं द्वारकेहून येऊन शिशुपालाच्या जाचांतून रुक्मिणीला मुक्त केले. आज ही आपली दासी त्याच विपत्तींत पडली आहे. बाबा दिल्लीस कैदेंत पडले आहेत. माझे काका, ज्यांच्या आश्रयाला मी सध्यां येऊन पडलें आहें, ते आपल्या बायकोच्या ह्मणण्यास मान देऊन सिंहाचा भाग जंबुकाला देण्यास तयार झाले आहेत. सध्यां माझ्या चुलतीचा भाऊ बिकानेरचा राजपुत्र येथेंच आहे. व त्या दुष्टांनीं मला धर्मभ्रष्ट करण्याचा विचार ठरविला आहें. यावेळीं मी अनाथ आहें. रक्षण करणार आपण समर्थ आहां."

आपली अनाथ दासी

जया.

---

## बारावा परिच्छेद.

एके दिवशीं अरुणोदयाचे सुमारास बादशाहा अल्लाउद्दीनाच्या लष्करामध्यें तुतारी वाजली. त्यावरून लोकांना समजलें कीं, आज बादशाहाची स्वारी शिकारीस जावयाची आहे. सर्व लोक आपापल्या तयारीस लागले. सुमारें दोन घंट्यांना कुच करण्याचा बिगूल वाजला, त्याबरोबर पायदळ व स्वार राजवाड्यासमोर जमले. तंबू वगैरे उंटावर लादून रवाना झाले. राजसभासद, प्रधानमंडळ, अमीरउमराव, त्याचप्रमाणें प्रजाजनांतील प्रमुख लोक आपापल्या इच्छित वाहनावर बसून शिकारीस निघाले. ढोल,

डफ, दमामा, दुंदुभी, भेरी, नरसिंहा इत्यादि अनेक प्रकारचीं वाद्यें वाजूं लागलीं. सेवकजनांनीं वाटेंत लागणाऱ्या अवश्यक वस्तु बरोबर घेऊन पुढें कूच केलें. हत्तीवर अंबारींत बसलेली बादशाहाची स्वारी मोठ्या इतमामानें निघाली. मध्यान्हीचे सुमारास हा सर्व लवाजमा नगरापासून नजीकच असलेल्या 'रमणा' नांवाच्या स्थळीं जाऊन पोंचला. तेथें पोंचल्यावर दोनप्रहर झालेली पाहून व रमणीय स्थळ अवलोकन करून बादशाहानें तेथेंच डेरा देण्याचा हुकुम केला. त्याबरोबर सर्व लोक आपल्याकरितां सोयीची जागा पाहूं लागले. त्यावेळेस त्या शांत अशा स्थलांत मोठा रमणीय देखावा दिसूं लागला. कोणी झाडाच्या खालीं एकटेच पडले आहेत, कोणी दहापांच मिळून दाट वृक्षछायेखालीं गप्पा मारीत बसले आहेत, कोणी आंघोळ करीत आहेत, कोणी फराळाच्या नादांत गुंतले आहेत व कोणी आपलीं शस्त्रें पुशीत बसले आहेत. अशा प्रकारें ते सर्व लोक उद्योगांत अगदीं निमग्न झाले आहेत. मध्यभागीं बादशाहाचा किनखापी तंबू झळकत होता. त्या तंबूचे द्वारापाशीं खुर्च्या पडल्या असून त्यावर खुद्द बादशाहाची स्वारी व इतर अमीर उमरावांपैकीं कांहींजण इकडच्या तिकडच्या गप्पा ठोकीत बसले होते. बादशाहाचा मुक्काम चार दिवस याच ठिकाणीं होता. चवथे दिवशीं वनरक्षकानें येऊन वर्दी पोंचविली कीं, " येथून जवळच एक जंगल आहे. तेथें हरणादिकांचे कळप नुकतेच आले आहेत, व पुष्कळ दिवस या रानांत शिकारही झालेली नाहीं." ही वर्दी पोंचतांच बादशाहास शिकारीस जाण्याची हुकी आली व दहा पांच सरदारांस बरोबर घेऊन बादशाहाची एका उमद्या घोड्यावर बसलेली सडी स्वारी शिकारीकरितां निघाली. थोड्याच वेळानें बादशाहाची स्वारी त्या जंगलांत शिरली, तोंच एक हरणाचा कळप दक्षिणेकडून येतांना दिसला. त्याबरोबर बादशाहा मोठ्या उत्सुकतेनें त्या हरणांचा पाठलाग करीत एकटाच पुढें निघाला. ज्या झुंडीच्या मागें बादशाहा लागला होता, ती तर बादशाहाचे तावडींतून निघून गेलीच; परंतु त्या रानामध्यें दहा बारा हरणें होती व त्याचीं पोरेंही तेथेंच वागडत

होती. बादशाहानें नेम धरून त्या हरणांवर तीर मारला व त्यांपैकीं एक काळवीट मरूनही पडला. तो काळवीट पडलेला पाहिल्याबरोबर सर्व हरणें चौखुर पळत सुटलीं व बादशाहानें त्यांचा पाठलाग केला. पुढें हरणें व मागें बादशाहा याप्रमाणें दौड चालली होती. बरेच लांब गेल्यावर बादशाहाचा घोडा ठेंचाळला व तो पडला. एखादा अडाणी स्वार असतां तर यावेळीं त्याची दुर्दशा काय झाली असती, याची कल्पनाही करता येत नाहीं; पण बादशाहा घोड्यावर बसण्याच्या कामांत अगदीं निपूण असल्यामुळें त्यानें यावेळीं घोड्यावरून एकदम उडी टाकली, ह्मणूनच त्याचा बचाव झाला. यानंतर जवळच्याच एका टेकडीवर जाऊन बादशाहा शिकार सांपडावी ह्मणून तीर सज्ज करून बसला.

संध्याकाळ तर झाली होती खरीच; पण तेथें वृक्षाची दाट झाडी असल्यामुळें सूर्यास्त होण्याच्या पूर्वींच तेथें काळोख पडला. बादशाहा शिकारीच्या नादांत इतका गढून गेला होता कीं, त्याला आपण आहोंत कोठें व वेळ किती झाला, याचें भानच राहिलें नाहीं. यावेळीं बादशाहा आपलें धनुष्यबाण सज्ज ठेऊन वीरासन घालून बसला होता; इतक्यांत पाठीमागून अचुक एक बाण येऊन त्याच्या कंबरेंत शिरला; तो वळून पाठीमागें पहातो तोंच दुसरा एक बाण बरगडींत घुसला; त्याबरोबर बादशाहा मूर्छा येऊन त्या टेंकडीवरून खालीं सुमारें १०।२० हात गडगडत आला.

---

## तेरावा परिच्छेद.

इकडे बरीच रात्र होईपर्यंत सैन्याला वाटलें कीं, बादशाहाची स्वारी एखाद्या शिकारीचे पाठीस लागली असेल व ह्मणूनच येण्यास इतका विलंब लागला. प्रहर रात्र झाली तरी बादशाहाचा पत्ता नाहीं, तेव्हां सर्वांसच मोठी काळजी लागली व त्यांनीं शोधास जाण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें ते निघालेही. सर्व रात्रभर ते बादशाहाचा शोध करीत हिंडत

होते, पण बिलकुल सुगावा लागला नाहीं. दुसरे दिवशीं सूर्योदयाचे सुमारास एक शिपाई रडत ओरडत व ऊर बडवीत येऊन सांगूं लागला कीं, शोध कसला करतां, बादशाहाला वाघ आपल्या गुहेंत घेऊन गेला. ही बातमी ऐकल्याबरोबर सर्व लोक त्या शिपायाच्या भोंवतीं जमले व बादशाहाचें वर्तमान ते त्यास अनेक तऱ्हेनें वारंवार विचारूं लागले, तेव्हां तो म्हणाला—"लष्करांतून मी एकटाच बादशाहा बरोबर निघालों. वाटेंत एका शिकारीच्या पाठीस लागलों; तों फारच दूर गेलों. स्वारी माझ्याही पुढें गेली होती. जातां जातां एका झाडींत शिरलों, तेथें वाघाची गर्जना कानीं आली, त्याबरोबर मी झट् झाडीच्या बाहेर येऊन वाघाची वाट पहात बसलों. कांहीं वेळानें पहातों तो समोरच्या टेंकडीवरून वाघ बादशाहाला तोंडांत धरून झपाट्यानें जात आहे. मी निशाण साधून आतां तीर मारणार तोंच वाघ वळणाचे पलीकडे जाऊन दिसेनासाही झाला." हें ऐकतांक्षणींच त्या सैन्यांत रडण्याचा एकच हाहाःकार उडाला व ते लोक तसे रडत ओरडतच नगरामध्यें येऊन पोंचले. नगरवासी जनांना ही बातमी लागतांच तेथेंही रडण्याचा जो कहर उसळला तो सांगतां येत नाहीं. जिकडे पहावे तिकडे करुणविलापाशिवाय कांहीं दिसत नाहीं व ऐकूं येत नाहींसें झालें. आणि एका क्षणांत करुणसमुद्रच जिकडे तिकडे उचंबळत आहे कीं, काय असें वाटलें.

इकडे दरबारी लोकांनीं विचार केला कीं, राज्य अराजक राहिलें तर राज्यामध्यें बंडे, दंगेधोपे होतील, तेव्हां कोणाला तरी लवकर तक्तावर बसवावे; व त्याप्रमाणें प्रधान मंडळींनीं बादशाही घराण्यांतील एकास राज्य देण्याचा ठराव करून अल्लाउद्दीनाच्या मृत्यूची खबर देशोदेशीं कळविण्याची तजवीज केली; परंतु बादशाहिणीनें याला हरकत आणली. तिचें ह्मणणें पडलें कीं, जोंपर्यंत बादशाहाच्या मृत्यूची कांहीं खूण आढळली नाहीं, तोंपर्यंत मी नवीन बादशाहाच्या राज्याभिषेकास सम्मत्ति देणार नाहीं.

# चवदावा परिच्छेद

पत्र पाठविल्यापासून जया व किशोरी यांना एक एक दिवस वर्षाप्रमाणें वाटूं लागला. त्यांना रात्रंदिवस घोर काळजीनें झोंपही येईनाशी झाली. पत्र पोंचल्यावर वीरसिंह महाराज येतील कां ? कां ते मुळींच येणार नाहींत; बरें, यदाकदाचित् आलेच तर आपली सुटका ते कशी करणार व होणार तरी कशी ? कां त्यांच्या मनांतही बादशाहाशीं होणाऱ्या वैरभावाचें भय उत्पन्न होईल ! इत्यादि अनेक कल्पना त्यांच्या मनांत येऊन त्या व्याकूल होत. कांहीं दिवस गेल्यावर एके दिवशीं दोनप्रहर दिवस उलटल्यावर डुंगरराम येऊन किशोरीला ह्मणाला:—"वीरसिंह महाराजांची स्वारी तर दिल्लींस आहे; पण त्यांचे धाकटे बंधू धीरसिंह यांनीं मजजवळून पत्र घेऊन वाचलें, व ते सध्यां माझ्या बरोबरच आले आहेत. नगरांत येणें बरें नाहीं असें समजून ते गांवाबाहेरच राहिले आहेत व मजबरोबर तुह्माला कळविण्याकरितां त्यांनीं निरोप सांगितला कीं," कसेंही करून कोटाच्या बाहेर एखाद्या एकांत स्थली येऊन मला भेटाल तर उत्तम होईल."

**किशोरी**०— त्यांची तुमची गांठ कोठें पडली ?

**डुंगरराम**—जेव्हां मी तेथें जाऊन पोंचलों, तेव्हां मला बातमी कळली कीं, पुष्कळ दिवस झाले, वीरसिंह महाराज कोठें बाहेरगांवीं गेले आहेत. तेव्हां या पत्राची वाट काय करावी, याचा मला मोठा विचार पडला. इतक्यांत छोट्या महाराजांची स्वारी दृष्टीस पडली. मी पुढें होऊन रामराम केला, तेव्हां त्यांनीं मला विचारलें, " तूं राहणारा कोठला ? " तेव्हां मीं ह्मटलें, " मी राहणारा मंगलगडचा आहें, पण आज जेसलमिराहून आलों आहें. थोरल्या महाराजांकडे कांहीं विशेष कामाकरितां आलों आहे व त्यांची मला गांठ घ्यावयाची आहे. " तेव्हां ते ह्मणाले—"बरेच दिवसापासून ते बाहेरगांवीं गेले आहेत. तुझें त्यांच्याकडे काय काम आहे तें मला सांगण्यासारखें असल्यास सांग. " मी पत्र काढून त्यांचे हातीं दिलें. तें वाचल्यावर त्यांच्या चेहेऱ्यावर उदासीनता आल्यासारखी वाटली, पण लागलीच ते आंत गेले व पोषाक करून येऊन मजबरोबर निघाले.

**किशो**०—ते एकटेच आले आहेत काय ?

**डुंगर**०—नाहीं. दोन चाकर व पांच स्वार बरोबर आहेत.

**किशोरी**०—त्यांचें वय किती असावें ?

**डुंगर**०—सोळासतरा वर्षांचें.

इतकें बोलणें झाल्यावर किशोरी जयेला ह्मणाली—" ऊठ, ही विलंब करण्याची वेळ नव्हे. तूं व मी येथून निघून जाऊं. " जयेनें विचारलें— " निघून चलणार कोठें ? " किशोरीनें उत्तर दिलें कीं, " त्याची काळजी मुळींच करूं नको. नगराच्या बाहेर एकांत स्थळें कोणतीं आहेत, हें मला पक्कें ठाऊक आहे व त्यांपैकीं एक मी डुंगररामास दाखवूनही ठेवलें आहे. तेथें तो धीरसिंह महाराजांना घेऊन येईल व आपण इकडून तेथें जाऊं ह्मणजे आपली व त्यांची गांठ पडेल. "

जयेनें येण्याचें कबूल केलें व सूर्यास्त झाल्याबरोबर त्या जाण्यास निघाल्या, तोंच जयेच्या दासीनें विचारलें, " बाईसाहेब कोठें जातां ? " किशोरीनें सांगितलें, " आज प्रदोष आहे, ह्मणून कोटाबाहेरील महादेवाचे दर्शनास आह्मी जातों. पण हें कोणाला कळवूं नको हो ? " इतकें सांगून त्या बाहेर तर पडल्याच; पण त्यांना मोठी भीति वाटूं लागली.

नगराच्या जवळच असलेल्या एका रानांत जाऊन त्या पोंचल्या; तेव्हां किशोरी ह्मणाली, " हेंच तें स्थान. आपण येथेंच उभ्या राहूं; मी डुंगररामाला याच ठिकाणीं बोलावलें आहे.

**जया**०— सखे, तूं ह्मणालीस ती जागा फारच रमणीय आहे, पण मला तर येथें फारच भीति वाटते.

**किशोरी**०— सखे, हें जंगल तर आहे खरेंच; पण तुला वाटतें तितकें हें भयप्रद नाहीं. पण तुझें चित्त यावेळीं दुःखानें व भयानें व्याप्त झालेलें असल्यामुळें तुला तसें वाटतें इतकेंच; तुला आठवण आहे कां कीं, आपण बऱ्याच जणी शीतळा अष्टमीचे दिवशीं देवीला गेलों होतों व येतांना आपणाला पाऊस लागला, तेव्हां आपण याच ठिकाणीं त्या पली

कडच्या झाडाखालीं क्षणभर थांबलों होतों. त्यावेळीं ही जागा तुला रमणीय वाटत नव्हती कां ? त्या वेळेपेक्षां आतां तुला हें स्थान भयानक कां वाटतें ?

**जया**०— होय सखे, त्यावेळची मला पक्की आठवण आहे. त्यावेळीं मला येथें मुळींच भीति वाटत नव्हती.

**किशोरी**०— होय ना ? मग आतां तुझ्या लक्षांत येईल कीं, त्यावेळीं आपण आनंदांत होतो व आतां दुःखांत आहोंत, ह्मणूनच तुझ्या मनाला असें वाटतें.

**जया**०— सखे किशोरी, तुझें ह्मणणें अगदीं बरोबर आहे. सुखी मनुष्याला सर्व जग सुखी दिसतें; पण माझ्या सारख्या हतभागिणीला स्वर्गांतही सुख मिळावयाचें नाहीं. हाय हाय ! ! ! माझ्या सारखी दुर्भागी स्त्री जगांतांतही नसेल ! ! मातृसुखाचा तर मला एक लेशही मिळाला नाहीं. काकूकडे पाहून मी आईची अठवण विसरलें, पण माझ्या दुर्दैवानें तीही स्वर्गवासी झाली; तरी बाबांनीं माझे लाड पुरवून मला आईची अथवा काकूची अठवण होऊं दिली नाहीं; पण विधात्याला तेंही सहन झालें नाहीं. माझे बाबा आज कोणत्या दुःखांत आहेत कोण जाणे ! त्यांच्या दुःखालाही हीच हतभागिनी कारण झाली, नाहींतर ते दिल्लीस कैदेंत कशाला पडते? पहा मी किती दुर्दैवी आहे ! ! माझें अद्याप लग्न झालें नाहीं तोंच माझ्याकरितां वीरसिंह महाराजांना किती कष्ट सोसावे लागत आहेत ? व आजतर माझ्याकरितां त्यांचे धाकटे बंधू धीरसिंह महाराज यांनाही कष्ट सोसण्याची पाळी आली आहे. व यांना यापुढें तरी किती कष्ट सोसावे लागणार आहेत कोण जाणे ?

**किशोरी**०—सखे या सर्व दैवाधीन गोष्टी आहेत. नशीबीं जसें लिहिलें असेल, तसें व्हावयाचेंच ? त्याला मनुष्याचा काय उपाय ?

अशा गोष्टी चालल्या असतांनाच घोड्यांच्या टापांचा आवाज त्यांच्या कानीं पडला; त्याबरोबर त्यांचें लक्ष तिकडे लागलें. इतक्यांत डुंगररामानें पुढें येऊन धीरसिंह महाराज आल्याची वर्दी दिली. जया व किशोरी

अदबीनें त्यांची वाट पहात उभ्या राहिल्या. इतक्यांत एक सोळासतरा वर्षांचा सुंदर राजकुमार, ज्याचा तोंडावळा वीरसिंहाप्रमाणेंच होता, घोड्यावरून उतरून त्यांच्या पुढें उभा राहिला. किशोरीनें खूण केल्यावरून डुंगररामानें त्यास खालीं बसावयास सांगितलें. राजपुत्र खालीं बसल्यावर ह्मणाला—"दादांच्या नांवाचें पत्र घेऊन डुंगरराम आला, परंतु बरेच दिवस झाले, ते दिल्लीस गेले आहेत; तेव्हां तें पत्र मी घेऊन वाचलें व त्यांतील आशय जाणून मी इकडे आलों, आतां कसें करावयाचें तें सांगावें."

हें ऐकून जया ह्मणाली—काय ? दिल्लीस कशाकरतां बरें जाणें झालें आहे ?

**धीरसिंह**—जेव्हां दादांनीं ऐकिलें कीं, रतनसिंह महाराज दिल्लीस अटकेंत आहेत व आपण मंडलगडास एकट्याच आहात, तेव्हां ते कांहीं सैन्य बरोबर घेऊन मंडलगडास गेले. तेथें गेल्यावर आपण तेथें नाहींत असें समजलें, तेव्हां ते त्याच पावलीं परत फिरले; वाटेंत काय झालें, हें आपण समक्षच पाहिलें. यवनांचा पाठलाग करून परत आल्यावर त्यांना समजलें कीं, आपण आपल्या चुलत्याच्या घरीं गेला; तेव्हां त्यांचें मन निश्चिंत होऊन ते तसेच परस्पर दिल्लीस निघून गेले. आतां त्यांना दिल्लीस इतके दिवस कां लागले, हें कळत नाहीं. दिल्लीहून त्यांचें पत्र घेऊन एक स्वार आला होता, त्यांत ही हकीकत लिहिली होती, ह्मणून तरी मला ठाऊक ! !

यावर जया कांहीं बोलणार तोंच धीरसिंहास कोणी असा एक तरवारीचा वार केला कीं, तो तेथें जखम लागून मूर्च्छा येऊन पडला. जया व किशोरी घाबऱ्या घाबऱ्या इकडे तिकडे पाहूं लागल्या, पण त्यावेळीं त्यांना तेथें कोणीही दिसलें नाहीं, अथवा कांहीं शब्दही त्यांस ऐकूं आला नाहीं; कांहीं वेळानें पुढील शब्द त्यांच्या कानीं पडले:—

"मला ठाऊक नव्हते, तूं अशी उद्दाम व कपटी आहेस." हे शब्द

उच्चारीतच एक नागवी तरवार घेतलेला पुरुष त्यांच्यापुढें येऊन उभा राहिला. व मोठ्या रागानें ह्मणाला—" तुला असें वाटलें काय कीं, तुझ्या वरचढ कोणीच राहिले नाहीं. तुझ्यांत असे गुण भरले आहेत, हें मला ठाऊक नव्हते. असो. आतां जें व्हावयाचें तें झाले. चल आतां येथून ?!!" यावेळीं जयेला त्याबरोबर जाण्याशिवाय अन्य मार्गच राहिला नाहीं. किशोरी व डुंगरराम हे झाडाच्या आड लपून बसले होते. त्यांनीं जयेला त्या पुरुषानें मेण्यांत घालून घेऊन जातांना पाहिलें. ती गेल्यावर ते दोघेजण धीरसिंहाजवळ येऊन बसले.

---

# पंधरावा परिच्छेद.

कांहीं वेळानें धीरसिंह सावध झाला व पहातों तो किशोरी व डुंगरराम पाण्यानें आपली जखम धूत आहेत व दोघांच्याही डोळ्यांतून आश्रुधारा चालल्या आहेत. धीरसिंहानें डोळे उघडल्याबरोबर किशोरी लाजून उभी राहिली. धीरसिंह उठून बसला व इकडे तिकडे पाहून " राजकन्या कोठें आहे" ह्मणून त्यानें प्रश्न केला. किशोरीच्या तोंडांतून रडण्याच्या आवाजाशिवाय शब्द निघाला नाहीं. डुंगरराम ह्मणाला— " आपण स्वस्थ व्हावें. " धीरसिंहानें आपल्या जवळील एक रुप्याची डबी काढली व त्यांतील मलम आपल्या जखमेवर लावण्याकरितां त्यानें डुंगररामास सांगितलें. किशोरीनें झट्कन ती डबी आपल्या हातांत घेतली व तींतील मलम जखम झालेल्या ठिकाणीं तिनें मोठ्या सावधपणानें लावलें; व त्याजवर पट्टी बांधली. धीरसिंहानें घाबऱ्या घाबऱ्या पुन्हां विचारले " राजकन्या कोठें आहे ?" यावेळीं किशोरीला उत्तर दिल्यावाचून राहवेना. ती स्फुंदत स्फुंदत ह्मणाली, " माझी सखी जया व मी ज्या दुःखांतून बाहेर पडण्याचा प्रयत्न करीत होतों, त्याच दुःखांत माझी सखी पुन्हां पडली. "

**धीरसिंह**—हं. हें असें कसें झालें ?

**किशोरी**—जेव्हां आह्मी राजवाड्यांतून बाहेर पडलों, तेव्हां एका दासीनें कुठें जातां ह्मणून आह्मास विचारलें. आह्मी कोटाबाहेरील महादेवाच्या दर्शनास जातो ह्मणून सांगितलें; त्यावरून मला वाटतें कीं, त्याच दुष्ट दासीनें बलभद्रसिंह महाराजास किंवा त्यांच्या बायकोस ही बातमी सांगितली, व त्यावरून महाराज येथें आले असावेत. आतां त्यांनीं आपणास काय समजून वार केला कोण जाणे ? नंतर त्यांनीं जयेला मेण्यांत घातले व घेऊन गेले. आतां माझ्या जयेची अवस्था काय होईल कोण जाणे ?" असें ह्मणून किशोरी रडूं लागली

**धीरसिंह**—ही वेळ धैर्य धरण्याची आहे. जर आपण धीर न धरतां रडण्यांत वेळ घालविला, तर त्यापासून कांहीं फायदा न होता उलट हानी मात्र होईल. तर धैर्य धरून जयेची पुन्हां सुटका कशी होईल, या संबंधींच विचार आपणांस केला पाहिजे.

**किशोरी**—जयेला महाराजांनीं कोठें ठेविली आहे, हें कसें समजणार ? आतां ती आपल्या हातीं लागणें मोठें कठीण आहे.

**डुंगरराम**—आपण काळजी करूं नका. मी आजच्या आज जयेचा शोध करून येऊन तुह्माला कळवितों. जयेचा शोध लावणें मोठें कठीण काम नाहीं. बलभद्रसिंहानें तिला जरी सप्त पातालांत दडवून ठेविले असले, तरी हा डुंगरराम तिला हुडकून काढल्याशिवाय राहणार नाहीं. महाराज, आपल्यासारख्या राजेलोकांच्या दरबारांतच मीं जन्म काढला व मोठमोठीं कठीण कामें करीत करीतच मी आतां ह्मातारा झालों आहे. चार दिवस या जगांत मला आतां काढावयाचे आहेत, तरी धन्याच्या कामाला कसूर होणार नाहीं. माझी खात्री आहे कीं, आपल्या पुण्यप्रतापानें मी जयेला शोधून काढीन. महाराज, या माझ्या बोलण्यावर तुह्मी पूर्ण विश्वास ठेवा; परंतु प्रथमतः माझी विनंती आहे कीं, आपल्या शरीराला फारच कष्ट झाले आहेत, तर आपल्या राहण्याखाण्याची मी प्रथम तजवीज करून देतों. तेथें आपण चलावे व स्वस्थ व्हावे. मग मी या कामगिरीवर जाईन.

डुंगररामाच्या या विनंतीला धीरसिंहानें व किशोरीनें रुकार दिला; व किशोरी हात जोडून ह्मणाली--महाराज, आतां आमचा सर्व भार तुह्मांवर आहे. आपण वाटेल तें करा पण माझ्या सखीची एकदां त्या दुःखांतून सुटका करा.

**धीरसिंह**--डुंगररामजी, माझ्याबद्दल आपण विशेष काळजी करूं नका. मला वाटतें, येथेंच जर एखादी निवाऱ्याची जागा असेल तरी बस्स आहे. राजकन्येची सुटका झाल्याशिवाय मला बिलकुल स्वस्थता वाटणार नाहीं.

**डुंगरराम०**--माझी अशी इच्छा आहे कीं, येथून जवळच एक खेडेगांव आहे, तेथें आपण चलावें अथवा या बाजूला थोड्या अंतरावर एक ब्रह्मचाऱ्याचा मठ आहे, तेथें चलावें.

**धीर०**--त्या मठांत आणखी कोणी रहात आहे का ?

**डुंगर०**--कोणी नाहीं. तेथें एक वृद्ध ब्रह्मचारी ईश्वराच्या भजनांत व पूजनांत काळ घालवीत असतो. तें स्थान फारच सुंदर आहे व तेथें अतीत अभ्यागत आल्यास त्यांनाही राहण्याची सोय आहे.

**धीरसिंह०**--बरें तर मग आतां रात्रही पुष्कळ झाली आहे, तेव्हां आपण आतां तिकडेच जाऊं या.

डुंगररामानें किशोरीला विचारलें कीं, "तुझी मर्जी कशी काय आहे ?" किशोरीनें उत्तर दिलें--"यांत मला तें काय विचारावयाचें आहे ? जें आपणाला बरें दिसेल तें करावें. परंतु माझें ह्मणणें असें आहे कीं, जर आपण आज्ञा दिली तर राजवाड्याजवळच माझी एक मानलेली बहीण आहे, तिच्या घरीं मी जातें व तिच्या साह्यानें सर्व बातमी मिळवून परत येतें. डुंगररामजी, तुह्मी येथें यांच्या तैनातीला रहावें. मी जर गेलें तर जयेलाही थोडासा धीर येईल. आतां आपणाला यश येणें परमेश्वराधीन आहे. होता होईपर्यंत मी उद्यां मध्यरात्रीच्या पूर्वी येथें अथवा जेथें ठरेल तेथें परत येऊन तुह्माला भेटेन"

किशोरीचें हें ह्मणणें धीरसिंहाला व डुंगररामालाही पसंत पडलें. परंतु धीरसिंह ह्मणाला, "असें जर आहे तर डुंगररामजी तुह्मीही इच्याबरोबर जाऊन सर्व वर्तमान घेऊन यावें. पण असें मात्र न व्हावें कीं, तुमच्यावरही कांहीं घोरपड अवचित् यावी व मला येथें काहींच वर्तमान कळूं नये."

किशोरी मोठ्या नम्रतेनें डोळ्यांत आंसवें आणून ह्मणाली, असें कदापि व्हावयाचें नाहीं. आपण निश्चिंत असा. मी खचित थोडासा काळोख पडल्यावर येईन व होता होईपर्यंत जयेलाही येतांना सोडवून आणीन." इतकें बोलून किशोरी डुंगररामासह निघून गेली.

---

# सोळावा परिच्छेद

भगवान चद्रदेवाची कामगिरी आटोपण्याची वेळ झाली आहे. यावेळीं तो आपला अधिकार सूर्याला देण्याकरितां त्याची वाट पहात होता. काल ज्यावेळीं चंद्र प्रकाशमान् होता त्यावेळी त्याची कांति किती झळकत होती, तो किती शोभायमान् दिसत होता, त्याचा प्रकाश क्षणोक्षणीं जगावर कसा पसरत जात होता? सर्व लोक त्याचेंच वर्णन करीत होते. जसजशी वेळ जात होती, तसतशी त्याची शोभा अधिकच वाढत जात होती. त्यावेळीं सूर्य नारायणाची कोणास अठवणही नव्हती. अशा अभिमानामध्यें लोक असतांनाच प्रकाश कमी होत चालला, व हळूं हळूं अंधेरही पडूं लागला. चोर दरवडेखोरांना आपलीं इच्छित कार्ये करण्यास सुसमय सांपडला. मोहमई निद्रेनें लोकांना असें ग्रासून टाकलें की, त्यांना आपल्या तनमनधनाचीही शुद्धि राहिली नाहीं. असो. अशा रीतीनें अंधेराचे प्राबल्य झाल्याबरोबर भूदेवीला तें बरें न वाटून तिनें चंद्रदेवांस बडतर्फ केलें व ती जागा सूर्यास देण्याकरितां त्यास बोलावणें पाठविलें. त्यानें येण्याची खूण भूदेवीकडे पाठवून दिली. चंद्रदेवांनीं रजा घेतली. अशा संधिकाळांत किशोरी

डुंगररामासह रतनकुंवरचे घराजवळ येऊन पोंचली. तिनें दारावर थाप मारली तरी दार उघडेना, ह्मणून तें खडबड खडबड हालविलें. हळूं हळूं हांकाही मारल्या. तेव्हां आंतून एका स्त्रीनें दरवाजा उघडला, तत्क्षणीं किशोरी व डुंगरराम आंत शिरले. किशोरीनें डुंगररामाला धीरसिंहाच्या सेवेकरितां पाठवून दिलें व दरवाजा लोटून रतनकुंवरचा हात धरून ती घरांत गेली. रतनकुंवर किशोरीची ही स्थिति पाहून घाबऱ्या घाबऱ्या विचारूं लागली- " किशोरी, आज हें काय आहे व तू अशी घाबरलेली कां दिसतेस ? लवकर सांग पाहूं ! जया खुशाल आहेना ? "

एक दीर्घ श्वास सोडून किशोरी ह्मणाली -" ताई, जेव्हां दैव उलटतें, तेव्हां ग्वात्रीच्या गोष्टी सुद्धां उलट होतात. या वेळीं परमेश्वर आह्मांवर कां रागावला आहे कोण जाणें ? "

**रतनकुंवर**०— अगे, पण झालें तरी काय ? तें तर सांगशील ?

**किशोरी**०— काय सांगू ताई ? या दुःखांतून सुटण्याला आतां माझा तुझ्यावरच काय तो भरंवसा आहे. नाहीं तर जें व्हावयाचें तें झालेंच आहे व होईलही.

**रतन**० — तुझ्या व जयेच्या कल्याणाकरितां मी आपले प्राण देण्यासही तयार होईन, हें तुला ठाऊक आहेना ?

**किशोरी**— काय सांगू ताई ? तुझ्यापासून कांहीं गोष्ट लपवून ठेवावयाची आहे असें नाहीं. त्या दिवशीं जयेच्या चुलत्याचुलतीनें जयेसंबंधीं केलेला बेत तुला मीं सांगितलाच; त्यानंतर तिनें एक पत्र धीरसिंह महाराजाकडे पाठविलें ह्मणून सांगितलें, त्याची तुला अठवण असेलच.

**रतन**०—होय. मला त्याची अठवण आहे. पुढें ?

**किशोरी**०— पुढें काय ? वीरसिंह महाराज तर भेटले नाहींतच; पण त्यांचे बंधू तें पत्र वाचून येथें आले आहेत; मी जयेला घेऊन फुटक्या बावडीनजीक त्यांना भेटावयास गेले. ताई, काय सांगू, आमच्या अर्ध्या

गोष्टी झाल्या नाहींत तोंच बलभद्रसिंह महाराज तेथें आले व त्यांनीं धीरसिंह महाराजास तरवारीनें वार करून जयेला मेण्यांत घालून आणलें.

इतकें बोलून किशोरी स्फुंदून स्फुंदून रडूं लागली. रतनकुंवरनें तिला पोटाशीं धरून ह्मटलें, " किशोरी, राजपुत्र जिवंत आहेना ?" किशोरीनें उत्तर दिलें, " त्यांना वार जोरानें तर लागला खराच, पण त्यांच्या पूर्वपुण्याईनेंच ते जिवंत राहिले. त्यांना किंचित् मूर्छा आली होती, आतां ते चांगले सावध झाले आहेत; पण जयेचा शोध लागला नाहीं, तर त्यांची गति काय होईल ? तर ताई, कसेंही करून तूं राजवाड्यांत जा, व तेथील बातमी घेऊन ये. " इतकें बोलून किशोरीनें रतनकुंवरचे पाय घट्ट धरले. रतनकुंवरनें तिला उचलून पोटाशीं धरलें व ती ह्मणाली " तूं भिऊं नको. मी वाड्यांत जातें व होता होईपर्यंत जयेला घेऊनही येतें. " इतकें सांगून रतनकुंवर वाड्यांत एकटीच निघून गेली.

राजवाड्यांत जाऊन पहाते तों तेथें तिला सर्व उदास दिसूं लागलें व लोक आपआपणाशींच कांहीं कुजबुजत आहेत, असें तिच्या दृष्टीस पडलें; ह्मणून ती आंत महालांत गेली, तों बलभद्रसिंहाची स्त्रीही मोठ्या रागांत आहे, असें तिनें पाहिलें. इतक्यांत बलभद्रसिंहही तेथें येऊन पोंचला.व मोठ्या दीनवाणीनें ह्मणाला—"जयेचा कोठेंच पत्ता लागत नाहीं, याला काय करावें ? आजपर्यंत आमच्या कुलाला असा कलंक लागला नव्हता. ईश्वरानें हें काय केलें बरें ? " यावर वसंतकुमारी ह्मणाली, " आपण काय पाहिजे तें ह्मणा, पण पहिल्यापासून मला तिचें लक्षण चांगलें दिसत नव्हतें; पण आपणांला राग येईल, ह्मणून मी बोललें नाहीं. " यावर बलभद्रसिंह ह्मणाला, जोंपर्यंत तिचा शोध लागला नाहीं, तोंपर्यंत तूं काय वाटेल तें बोलून घे. परंतु जया सद्गुणी आहे, याबद्दल मला अद्यापही संशय वाटत नाहीं. यावर काय असेल तें देवास ठाऊक ! ! "

राजवाड्यामध्यें यावेळीं एकच धांदल उडून गेली होती. कोणी ह्मणत तिनें जीव दिला असेल, कोणी ह्मणत, ती कोणाचा हात धरून उठून

गेली असेल, व कोणी ह्मणत, तिला बादशाहानें पळवून नेली असेल. अशा प्रकारें ज्यांला जें वाटेल तें ते बोलत असत. रतनकुंवर सगळ्या राजवाड्यांत याच गोष्टी ऐकत होती, त्यावरून तिची खात्री झाली कीं, जया राजवाड्यांत आली नाहीं व ती येथें नाहींही. किशोरी ज्याला बलभद्रसिंह समजली, तो दुसराच कोणी बादशाहाचे सैन्यापैकीं मनुष्य असावा. ही कल्पना फक्त रतनकुंवरचीच असें नाहीं, तर तेथें असलेल्या बहुत लोकांना असेंच वाटलें व त्यांनीं जयेचा शोध करण्यास्तव लोक पाठविण्याचें ठरविलें; पण बसंतकुमारीस हें पसंत पडलें नाहीं. तिचें ह्मणणें असें पडलें कीं, जर बादशाहाच्याच लोकांनीं जयेला नेली असेल, तर ते लोक थोडे थोडके नसतील; व जर इकडून लोक तिच्या शोधार्थ पाठविले तर बादशाही सैन्याशीं लढाई करावी लागेल व उगीच द्वेषभाव वाढेल; तर बरी ब्याद गेली असें समजून स्वस्थ राहावें.

हें ऐकल्याबरोबर बलभद्रसिंहाच्या भिंवया चढून गेल्या, त्याचें डोकें रक्ताप्रमाणें लाल दिसूं लागलें व त्याचे ओंठ थरथर कापूं लागले; व तो गंभीर स्वरानें ह्मणाला—"काय ? एका क्षत्रियाची कन्या मुसलमानांनीं पळवून न्यावी व त्यानें स्वस्थ बसावें, असें तुझें ह्मणणें ? जर हें वर्तमान इतर लोकांना कळलें, नव्हे, माझ्या प्रत्यक्ष भावास कळलें, तर तो मला काय ह्मणेल ? त्यांच्यापुढें मी हें काळें मुख कसें दाखवूं ? बस्स, माझें सर्वस्व गेलें तरी बेहेत्तर, पण हा असा अपमान नाहीं माझ्यानें सहन होणार ! !

हा वादविवाद चालला असतांना रतनकुंवर राजवाड्यांतून तडक आपल्या घरीं आली. रतनकुंवरला पाहिल्याबरोबर किशोरी ह्मणाली, "ताई, जया कोठें आहे ?" रतनकुंवरनें उत्तर दिलें कीं, "जया राजवाड्यांत नाहीं व तिला बलभद्रसिंहानें आणलेंही नाहीं" या तुमच्या समजुतींत चूक नाहीं. त्यानें तिला मुळींच आणलें नाहीं. इतकें बोलून तिनें राजवाड्यांत पाहिलेल्या व ऐकिलेल्या सर्व गोष्टी किशोरीस सांगितल्या. त्या ऐकून किशोरी ढळढळां रडूं लागली. रतनकुंवरनें तिचें बहुत प्रकारें सांत्वन

केलें व ती अखेर ह्मणाली, " किशोरी, यावेळीं अशी घाबरूं नकोस, धीर धर. ही सर्व हकीकत राजपुत्रास जाऊन कळीव ह्मणजे तो याला कांहीं तोड काढील. सर्व दिवस एकसारखेच राहतात असें नाहीं. आज तुह्मांला दुःख भोगावें लागत आहे, पण मागाहून सुखही तुह्मांला मिळणार आहे. "

किशोरी रडत रडत ह्मणूं लागली—ताई, मला आतां जगण्याची व सुख भोगण्याची लालसा राहिली नाहीं; मात्र इतकेंच वाटतें कीं, मला एकदां जया भेटावी व तिचें एकदां वीरसिंहाबरोबर लग्न झालेलें पहावें. " रतनकुंवर तिला पोटाशीं धरून ह्मणाली—उगी रडूं नको. हा पाहिलास कां दोन प्रहर दिवस आला. तो बिचारा तिकडे तुझी वाट पहात चिंताक्रांत बसला असेल, तर आतां येथें विशेष उशीर करतां उपयोग नाहीं.

किशोरी ह्मणाली—आतां मी तर जातेंच; पण जयेची भेट झाली तरच तुला पुन्हां भेटेन, नाहीं तर हीच तुझी माझी शेवटची भेट समज. यावर रतनकुंवर ह्मणाली—" मी तुला आतां एकटी सोडणार नाहीं. मीही तुझ्याबरोबर येतें. " किशोरीनें तिनें न यावें ह्मणून पुष्कळ जिकीर केली, पण ती आपला आग्रह सोडीना. शेवटीं दोघीही निघाल्या व जेथें राजपुत्र धीरसिंह उतरला होता, तिकडच्या मार्गास लागल्या.

---

# सत्रावा परिच्छेद

दुरून दोन स्त्रिया येत आहेत, असें पाहून धीरसिंहाला जया व किशोरीच येत आहेत, असें वाटलें; व त्याचें अंतःकरण प्रसन्न झालें. तो धांवत धांवत त्यांचे जवळ येऊन पोंचला; मात्र किशोरी ढळढळा रडूं लागली. तिला रडतांना पाहून धीरसिंह घाबरून ह्मणाला—" कां ? काय खबर आहे ? " किशोरीनें घडलेलें इत्थंभूत वर्तमान त्यास कळ-

विलें व स्वतः रतनकुंवरनेंही वाड्यांत पाहिलेली हकीकत सांगितली. तें वर्तमान ऐकून धीरसिंह विस्मित झाला व त्याबरोबर त्याला दुःखही वाटलें. कांहीं वेळ त्याच्यानें मुळीं बोलवेचना ! ! पुढें तो ह्मणाला, " मग जयेला मेण्यांत घालून नेणारा मनुष्य कोण असावा बरें ? किशोरी ह्मणाली, माझें असें अनुमान आहे कीं, तो मनुष्य सरफराजखां किंवा त्याचा सांथीदार असावा. जेव्हां तो जयेला घेऊन गेला, तेव्हां तो शहराच्या बाजूस न वळतां जंगलाकडे गेला. मला त्याचवेळेस शंका आली, पण मला त्यावेळीं एक शब्दही बोलण्यास सुचला नाहीं. जर त्यावेळेस मला तो बलभद्रसिंहच आहे, अशी भूल पडली नसती, तर तो आपल्या हांतून खचित सुटतांना ? पण मला त्यावेळीं भ्रम पडला, त्याला काय करावयाचें ? ईश्वराची मर्जी ! !

**धीरसिंह**—सरफराजखां तो कोण ?

**किशोरी**—तो बादशाहाचा सेनापति. ज्यानें आह्मांला वाटेंत कैद केलें व ज्याच्याशीं थोरल्या महाराजांचें युद्ध झालें, तो सरफराजखां ! त्या युद्धामध्यें त्याला तरवारीचा वार लागला होता, पण त्याच्या साथीदारांनीं त्याला युद्धांतून पळविलें; व ह्मणूनच तो बचावला. कालही तो ठार मरता, पण ईश्वरी सत्तेपुढें कोणाचा इलाज ?

**धीरसिंह**—असें काय ? तर मग तुह्मी भिऊं नका. मी आतां जाऊन त्याच्या कर्माचें त्याला प्रायश्चित्त देतों व जयेला सोडवून आणतों. तो जातो कोठें माझ्यापुढें ?

**किशोरी**—विधात्यानें आमचें काय करण्याचें योजलें आहे व अद्यापि आह्मांला किती दुःख भोगावयाचें आहे कोण जाणें ? कारण ज्याच्या आश्रयाला आह्मीं जावें त्यालाच आह्मांकरितां कष्ट सोसावे लागतात व जो उपाय आह्मी योजतों; तो आपला निश्चयानें फसवितोच. ! !

**धीरसिंह**— जगामध्यें अशा गोष्टी घडावयाच्याच ? परंतु मनुष्यानें

त्यांला भिऊन घाबरतां उपयोग नाहीं. ईश्वरी इच्छेनुरूप मनुष्याच्या पापपुण्याप्रमाणें त्याला फळें भोगावीं लागतातच; पण त्याचें निवारण करण्याचा प्रयत्न करणें मनुष्याचा धर्म आहे.

**किशोरी**—असो, जें व्हावयाचें तें झालेंच; पण मी आतां आपणांस हात जोडून विनंती करतें कीं, आपण त्या दुष्टाचा पाठलाग करण्याच्या नादाला लागूं नये. आपले थोरले बंधू आह्मांकरितां कष्ट सोशितच आहेत, तेव्हां तुह्मीही आपला जीव धोक्यांत घालून घेऊं नये. आपण आतां आपल्या आईबापांच्या भेटीला परत जावें. त्या बिचाऱ्यांचे डोळे अगदीं आपणाकडे लागले असतील व त्यांच्या जिवाची काय दशा होत असेल !! तर महाराज आपण आतां घरींच जावें. अशी आपणांस मी पुन्हां विनंति करतें. आह्मा भाग्यहीनांचें जें होणें असेल तें होईल !!

**धीरसिंह**—तुह्मी आपल्या जिवाला असा संकोच कां करून घेतां ? आह्मी जातीचे क्षत्रिय आहोंत व दुष्टांचा नाश आणि सुष्टांचें पालन करणें हेंच आमचें कर्तव्य कर्म आहे. आमच्याकरितां तुह्मी घाबरण्याचें बिलकुल कारण नाहीं. तुह्मी हें पक्कें समजून ठेवा कीं, सरफराजखांचा पराभव करून जयेला सोडवून आणण्याची ताकद आमच्या अंगीं आहे. तुह्मी अगदीं स्वस्थ असा.

इतकें बोलून धीरसिंह उठून उभा राहिला व डुंगररामास ह्मणाला, डुंगररामजी, मी परत येईपर्यंत तुह्मी इचा सांभाळ करा.

किशोरी जयेचें नांव घेऊन मोठमोठ्यानें रडूं लागली व ह्मणाली—"डुंगररामजी, तुह्मी तरी यांना न जाण्याबद्दल कांहीं सांगा." हें ऐकून धीरसिंहाचें मन खचल्यासारखें झालें व त्याचे नेत्र अश्रूंनीं भरून आले.

त्या दोघांचीही तशी स्थिति झालेली पाहून डुंगरराम ह्मणाला, "आपण क्षत्रिय आहांत, तर अशा वेळीं आपण अधीर होतां कामा नये. एक ह्मण आहे कीं, "धीरज, धर्म, मित्र अरु नारी । आपदकाल परखिये चारी" तर आपण अशा आपत्कालामध्यें धीर न सोडतां इला धीर द्यावा.

ईश्वराची लीला अपरंपार आहे. तो काय करील कोण जाणे ? माझी अशी विनंति आहे कीं, मी ब्राह्मणाचा मुलगा आहे, तरी जन्मापासून क्षात्रियाचें अन्न खाल्लें आहे; तर मला एकट्याला आज्ञा करावी, म्हणजे मी जाऊन त्या दुष्टापासून राजकन्येला सोडवून आणतों. यवनासारख्या दगलबाज लोकांना जेरीस आणणें कठीण नाहीं. जे कपटी व छळीक असतात, ते वीर व साहसी नसतात. पराक्रमी लोक नेहेमीं निष्कपटी व साहसी असतात. सरफराजखां मला वाटतें एकटाच असेल; फार तर दोन चार शिपाई असतील; व तो अजून फार लांबही गेला नसेल, तर मी जातों व त्यालासुद्धां बांधून आणतों.

डुंगररामानें अशा प्रकारें बहुत सांत्वन केलें, पण त्याचा कांहीं उपयोग तर झाला नाहींच, पण उलट त्याला जास्त वीरश्री मात्र चढली. तो म्हणाला "डुंगररामजी, आपण इला संभाळावें, मी जातों व आतां त्या दुष्टाचें शासन करून राजकन्येला घेऊन येतों. तुम्ही आपल्या दुःखाचा हा शेवटचा दिवस समजा. मी राजकन्येस घेऊन येतां, व तुम्हांला मी आपल्या राजधानींत घेऊन जातों व मग तेथें तुम्ही आनंदांत रहा". इतकें बोलून धीरसिंह उठलाच; इतक्यांत खाली मान करून किशोरी डुंगररामास म्हणाली— "तुम्ही या वेळेस यांना जाऊं देऊं नका. त्या दुष्टानें केलेली कृति किती भयंकर आहे. कांहीं आपली पूर्व पुण्याई होती, म्हणून हा दिवस दिसला. त्या जखमेनें तर फारच क्षीणता आल्यासारखी दिसते, तर यांच्यानें जावणार कसें ? व जया यांना मिळणार कशी ? "

धीरसिंहाला यांना कोठें ठेवावें, याची मोठी काळजी पडली होती, पण रतनकुंअरनें त्याची ती काळजी दूर केली. तिनेंही धीरसिंहानें जाऊं नये म्हणून आग्रह केला, पण त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं, असें पाहून तिनें किशोरी व डुंगरराम यांस आपल्या घरीं ठेवण्याचें कबूल केलें. धीरसिंहास बराच धीर आला. धीरसिंहानें आपल्या गळ्यांतील मोत्याचा कंठा रतनकुंवर नको नको म्हणत असतां—खर्चाकरितां म्हणून—किशोरीच्या

गळ्यांत घातला व तो रतनकुंवरला ह्मणाला—"आतां यांना मी आपल्या स्वाधीन केलें आहे, तर परत येईपर्यंत यांची चांगली जपणूक करा". असें सांगून तो उठला. किशोरीही उठली. तिच्या मनांतून कांहीं बोलायचें होतें, पण शब्दच बाहेर उमटेना. धीरसिंह ह्मणाला—"मला आतां विलंब करून उपयोग नाहीं; जर विलंब होईल तर ते दुष्ट लांब निघून जातील व राजकन्येला जास्त त्रास होईल, तो निराळाच. तर आपण गुप्तपणें रहा. नाहीं तर बलभद्रसिंहाचे तावडींत सापडून पुन्हां विपत्तींत पडाल."

**डुंगरराम**—आपण आतां कांहीं काळजी करूं नका. मी सर्व बंदोबस्त करतों.

इकडे धीरसिंहानें घोड्यावरील सामान आपल्या हातानें कसलें व एक पाय रिकिबींत ठेवलेला व दुसरा जमीनीवर असतांनाच तो किशोरीला ह्मणाला—"मी तुझ्या मर्जीविरुद्ध चाललों तर खराच, पण तिकडे गेल्याशिवाय जिवाला स्वस्थता वाटत नाहीं. तुह्मी उमेदीनें रहा. परमेश्वर आपली लवकरच भेट करवील."

इतकें बोलून धीरसिंहानें किशोरीकडे एकदां डोळे भरून पाहिलें. ही त्याची दृष्टि अशी कांहीं विलक्षण होती कीं, तिचें वर्णन करण्यास ही एकमति लेखणी समर्थ नाहीं. रसज्ञ वाचकांनीं त्याचें केवळ अनुमान करतां आलें तर करावें. तिच्याकडे पहातां पहातांच त्यानें धरित्रीवरील पाय घोड्यावर टाकला व अशी टांच मारली कीं, देखतां देखतांच तो घोडा तीरासारखा भरधांव निघाला व लवकरच दिसेनासाही झाला.

असें ह्मणतात कीं, चित्त एकेच गोष्टीकडे सारखें लागतें; पण यावेळीं धीरसिंहाच्या चित्ताचे किती तुकडे झाले होते कोण जाणे? घोडा हांकण्याकडे चित्त, रस्ता पहाण्याकडे चित्त, किशोरीकडे चित्त, जयेकडे चित्त, थोरल्या भावाकडे चित्त, घरीं आईबापांच्याकडे चित्त, असें त्याचें चित्त अनेक ठिकाणीं जणूं वाटलें गेलें होतें व त्याच त्याच्या चिंता होत. व अशा चिंतांचें चिंतन करीत करीतच तो चालला होता.

---

# अठरावा परिच्छेद.

वीरसिंहाबरोबर झालेले युद्धांत सरफराजखांस जखम झाली व त्याला त्याच्या सांथीदारांनीं युद्धभूमीवरून उचलून एका जंगलांत नेलें व तेथें त्याच्या जखमेस मलमपट्टी वगैरे बांधली. कांहीं वेळानें तो सावध झाला, तेव्हां त्यानें जयेकडील खबर आणण्यास एक मनुष्य पाठविला व आपण तेथेंच राहिला. कांहीं दिवस गेल्यावर तो शोध करण्यास गेलेला मनुष्य परत आला व त्यानें सरफराजखांस जैसलमिराकडील सर्व हकीकत निवेदन केली; तेव्हां सरफराजखां वेष पालटून जैसलमिरास जाऊन राहिला व त्यानें आपला एक सांथीदार बलभद्रसिंहाचे येथें नोकर ठेविला.

ज्या दिवशीं किशोरी व जया सायंकाळीं राजवाड्याबाहेर गेल्या, त्या वेळीं त्या सांथीदारानें त्यांस बाहेर जातांना पाहिलें व सरफराजखांस त्याबद्दल वर्दी दिली. ती वर्दी मिळाल्याबरोबर सरफराजखानें एक मेणा, व चारआठ भोई बरोबर घेतले व जेथें जया व किशोरी धीरसिंहाबरोबर बोलत बसल्या होत्या, तेथें त्यांचे आसपास जाऊन तो छपून बसला. यावेळीं शुक्राच्या चांदणीचा अंधक प्रकाश पडला होता; त्या प्रकाशांतून तो झाडांच्या आड लपत छपत हळूं हळूं पावलें टाकीत ती मंडळी बोलत बसली होती, त्यांच्या अगदीं नजीक जाऊन पोंचला; तेव्हां त्याला दोन स्त्रिया व त्यांच्याबरोबर बोलत असलेला एक तरुण पुरुष दिसला व जवळच एक गृहस्थ उभा असलेला त्यानें पाहिला. कांहीं वेळ तो तेथेंच त्यांचीं भाषणें ऐकत उभा राहिला व तितक्या वेळांत त्यानें जया कोणची, हेंही ओळखून ठेवलें. त्याच्या मनांत तेथें राजरोसपणानें जावें, असें आलें, परंतु काय परिणाम होईल, याची खात्री न पटल्यामुळें तो विचार त्याच्या मनांतून निघून गेला व त्यानें साधली तितकी बलभद्रसिंहाची ऐट आणून तो एकदम पुढें सरसावला व त्यानें धीरसिंहास तरवारीचा वार केला. हा वार ओझरता लागला, तरी तेवढ्यानें त्याचें काम झालें. नंतर

तो एकदम पुढें सरसावला व त्यानें जयेला मेण्यांत घालून जंगलाचा रस्ता सुधारला. जैसलमिरच्या शिवेचे बाहेर गेल्यावर त्याच्या मनांत तेथेंच मुक्काम करावा, असें आलें; पण तेथेंच कांहीं लोक उतरले आहेत, असें त्यानें पाहिलें, तेव्हां तो तडक पुढें निघाला व सर्व रात्रभर मार्गक्रमण करून तो बराच लांबवर जाऊन पोंचला.

उजाडतां उजाडतां ते एका खेडेगांवच्या शिवेवर जाऊन पोंचले, व त्यांनीं तेथेंच एका रानांत मुक्काम करण्याचें ठरविलें व भोयांस विश्रांति घेण्यास सांगून कांहीं सामानसुमान आणण्यास त्यानें एक मनुष्य गांवांत पाठविला. यावेळीं जया भय आणि दुःख यांनीं अगदीं विव्हल होऊन गेली. पारध्याचे जाळ्यांत सांपडलेल्या हरिणीची जी दशा होते, त्यापेक्षां जयेची स्थिति सुखदायक नव्हती; व त्यांत सरफराजखां तिच्या दुःखावर डाग देई. तो ह्मणे, " आपण धीर सोडूं नका. परमेश्वरानें आपल्या कपाळीं बादशाहाची बीबी होण्याचें लिहिलें आहे, हें तुमचें भाग्य समजा. गेल्या रात्रीं आपणांला फार त्रास झाला असेल; तर आतां उजाडलें आहे, मेण्याचे बाहेर येऊन हातपाय धुवून आपलें मन शांत करा." हें सरफराजखांचें बोलणें कांनीं पडतांक्षणींच ती जी स्वस्थ पडली होती, ती एकदम रडूं लागली व सरफराजखां जसजशी तिची समजूत करूं लागला तसतशी तिच्या दुःखास जास्तच भरती येऊन ती ढळढळा रडूं लागली.

जो मनुष्य गांवांत सामानसुमान आणण्यास गेला होता, तो कांहीं वेळानें परत आला; तेव्हां तो सांगूं लागला कीं, बादशाहास वाघानें खाल्लें, असें गांवांत लोक बोलत होते. ही बातमी ऐकल्याबरोबर सरफराजखांवर आकाश कोसळल्यासारखें झालें, त्याच्या शरीराला कांपरें भरलें व त्याच्या डोळ्यांतून अश्रुपात होऊं लागला. परंतु इकडे जयेच्या हृदयांत चेतनाशक्तीचा प्रादुर्भाव झाला; तिच्या चेहऱ्यावर कांति झळकूं लागली व ती खुषीनें मेण्याच्या बाहेर येऊन उभी राहिली. चंद्र उगवला असतां ज्याप्रमाणें अंधकार नाहींसा होतो, त्याप्रमाणें जयेला पाहून सर-

फराजखांचे हृदयांतील बादशाहाचे मरणाबद्दल झालेलें दुःख नाहींसें झालें. त्यानें त्या बातमी सांगणाराला जाण्यास सांगितलें. तो गेल्यावर सरफराजखांचे मनांत असें आलें कीं, ज्या बादशाहाकरितां मीं इतके कष्ट सोसून हें रत्न पैदा केलें, तो बादशाहा तर परलोकीं निघून गेलाच; तेव्हां आतां या रत्नाचा उपभोग आपण कां घेऊं नये ? जयेच्या संबंधानें सरफराजखांचे मनांत पूर्ण पापवासना भरली. तो निःशंकपणें जयेचे तोंडाकडे निरखून पाहूं लागला. कामदेवानें त्याच्या शरीरांत आपला अम्मल इतक्या जोरानें बसविला कीं तो अगदीं निर्लज्ज बनला; त्याला कशाचेंही भान राहिलें नाहीं व तो त्या उन्मत्तावस्थेमध्यें एकदम उठून उभा राहिला. त्याच्या या चेष्टा पाहून त्याच्या मनांतील भाव जयेला झटकन् समजून आला. जसजशी त्याची चर्या बदले, तसतसा जयेचे चेहऱ्यावरही फरक होऊं लागला; त्यानें जयेला 'प्रिये' ह्मणून हाक मारल्याबरोबर जयेच्या शरीरांत कोपाग्नि भडकून गेला. तिनें त्या भरांत आपल्या लुगड्याचा कांचा कसला व सरफराजखां पहात असतांनाच तिनें त्याची जवळच पडलेली तरवार आपल्या हातांत घेतली व ती त्याच्या समोर जाऊन उभी राहिली. यावेळीं जयेची ती विचित्रमूर्ति पाहून भयच वाटे. कमरेस कसलेला काचा, हातांत नंगी तरवार, लालभडक नेत्र, दांत जोरानें ओठावर रोवलेले, आणि एक पाय पुढें ठेवलेला, अशी ती भयानक मूर्ति जणूं महिषासुरमर्दिनी देवीसारखीच उग्र दिसत होती. तिला अशा स्वरूपांत पाहिल्याबरोबर सरफराजखां भयानें अगदीं गर्भगळीत झाला. कांहीं वेळानें त्यानें जयेस पकडण्याचा निश्चय केला व तो त्या नादालाही लागला. तो गोड भाषणें करीत जयेच्या अगदीं नजीक येऊन पोंचला व तो आतां जयेचे हात धरणार, तोंच जयेनें हातांत असलेल्या तरवारीचा त्याच्या मानेवर असा जोरानें वार केला कीं, त्या तडाक्यासरसें सरफराजखांचें शीर व धड वेगळें झालें.

---

# एकोणिसावा परिच्छेद.

किशोरी व डुंगरराम यांस सोडून धीरसिंह जो निघाला, तो त्यानें आपल्या बरोबर आणलेल्या स्वारांचा जेथें तळ पडला होता, तेथें येऊन पोंचला. त्यानें आपल्या स्वारांस घडलेला सर्व वृत्तांत कथन केला. तेव्हां ते ह्मणाले ' महाराज, काल सुमारें याच वेळेला अथवा यानंतर थोड्या वेळानें या रस्त्यानें एक मेणा व त्याबरोबर असलेले दोन चार लोक गेले. त्यांचा येथें मुक्काम करण्याचा विचार दिसला; पण काय झालें कोण जाणें, ते या जंगलांतील रस्त्यानें पुढें निघून गेले. "

हें ऐकल्याबरोबर धीरसिंहाच्या मनानें घेतलें कीं, तो मेणा खास जयेचाच होता. त्यानें त्यांचा पाठलाग करण्याचा विचार केला व आपल्या स्वारांसही बरोबर चलण्यास हुकुम दिला. एक रात्र व एक दिवस इतक्या वेळांत ते किती लांब गेले असतील ? ते पायीं जात आहेत व आह्मी घोड्यावर स्वार आहोंत; तेव्हां त्यांना गांठण्यास फारसा उशीर लागणार नाहीं, असा विचार करून ते निघाले. त्यांच्या मनाच्या वेगाप्रमाणें जर घोडे वेगानें चालते, तर किती उत्तम झालें असतें, पण रात्रीची वेळ व रस्ता वाईट यामुळें त्यांना आपल्या इच्छेप्रमाणें जातां येईना; अशा प्रकारें त्यांनीं पहाट होईपर्यंत मार्ग कंठला. पुढें मार्ग चांगला लागला, झाडी वगैरे आतां कांहीं नव्हती. थोडें पुढें गेले, तों त्यांना शेतेंही लागलीं, तेव्हां त्यांना असें वाटलें कीं, येथें आसपास कोठेंतरी गांव असावा; तेव्हां त्यांनीं आपले घोडे थोडे वेगानें चालविले. लवकरच त्यांनां एक खेडेगांव दिसूं लागलें. व त्याच्या अलीकडे एका ओढ्यांत त्यांनीं स्वच्छ पाण्याचा झरा पाहिला. ते सर्वजण घोड्यांवरून खालीं उतरले. घोड्यांस पाणी पाजून त्यांस त्यांनीं हुशार केलें. त्यांनींही आपला शौच मुखमार्जन विधि आटोपला व पुन्हां घोड्यावर स्वार होऊन ते त्या गांवांत जाऊन पोंचले. असलीं खेडेगांवें पहाण्याचा, राजपुत्राला कधींही प्रसंग आला नसल्यामुळें चिखलाचे गोळे

रचून तयार केलेल्या भिंती व उसाच्या वाळलेल्या पातींचीं बनविलेलीं छपरें पाहून त्यास फार कौतुक वाटलें; व त्याच्या मनाला स्वस्थता असती तर तो तो गांव पहाण्यांत कांहीं वेळ घालविताही; पण जयेचा शोध करण्याशिवाय त्यास सध्यां कांहीं दिसत व भासत नसल्यामुळें तो त्या नादाला बिलकुल लागला नाहीं. गांवाच्या तोंडाशीं जातांच त्याला दोन-चार असामी एका आगटीपाशीं शेकत बसलेले दिसले; तो त्यांज-जवळ गेल्याबरोबर ते सर्व लोक उठून उभे राहिले व त्यांस लवून रामराम करूं लागले. धीरसिंहानें घोडा थांबवून त्यांस विचारलें—"काल आज या वाटेनें कोणी लोक गेलेले तुह्मी पाहिलेत काय?" हें ऐकून ते सर्वजण गप्प राहिले; पण त्यांतील एक वृद्ध मनुष्य पुढें येऊन रामराम करून ह्मणाला— " महाराज, काल या वेळेला त्या पलीकडल्या रानांतून चारपांच मुसलमान एक डोली घेऊन जातांना मीं पाहिले. "

**धीरसिंह**—त्या लोकांनीं येथें मुक्काम केला होता काय ?

**वृद्धमनुष्य**—ते तिकडे राहिले होते कीं काय कोण जाणे ? पण त्यांच्यांतील एक मनुष्य कांहीं सामानसुमान घेण्याकरितां गांवांत आला होता.

**धीर**०—त्यानें आपण कुठें जातों, ह्मणून कांहीं सांगितलें का ?

**वृ०म**०—दिल्लीच्या बादशहाकडे जातों, ह्मणून कांहीं बोलत होता खरा.

**धीर**०—आणखी कांहीं बोलत होता कां ?

**वृ० म**०—जेव्हां आह्मीं ह्मटलें कीं, बादशाहा शिकारीमध्यें मारला गेला, तेव्हां कांहीं न बोलतांच तो निघून गेला.

**धीर**०—बादशाहा मारला गेला, हें तुह्माला कोणीं सांगितलें ?

**वृ०म**०—परवा या वाटेनें एक सांडणी स्वार गेला, तो ह्मणत होता.

**धीर**०—ते लोक कोणीकडे गेले व केव्हां गेले ?

**वृ०म**०—तें कोण जाणें बोवा ? !

धीरसिंहाच्या मनांत यानंतर अनेक कल्पना घोळूं लागल्या. त्यानें पुन्हां जंगलाचा मार्ग स्वीकारला. कोस अर्धकोस गेले नाहींत तोंच त्यांना एक झाडी लागली. लांबवर दृष्टि देऊन पहातात तों तेथें कांहीं पडलें आहे असें त्यांना वाटलें. ते हळूं हळूं दबकत दबकत तेथें जाऊन पहातात तों एक छिन्नविछिन्न झालेलें प्रेत तेथें पडलेलें त्यांच्या दृष्टीस पडलें; जवळच एक रक्तानें भरलेली तरवार पडली होती व तेथून थोड्या अंतरावर एक मेणा ठेवलेला त्यांना दिसला. झटदिशीं धीरसिंह त्या मेण्यापाशीं गेला व पडदा एकीकडे करून त्यानें आंत पाहिलें; पण आंत कोणीही नव्हतें; फक्त त्यांत एक शालू गुंडाळून ठेवलेला दिसला व धीरसिंहानें तो जयेचाच म्हणून ओळखलाही. धीरसिंहानें तो शालू उलगडला; व पहातो तों त्यांत जयेचे कांहीं मूल्यवान किमतीचे दागिने आहेत, असें त्यानें पाहिले व त्यांतच एक चपटा दगड त्याला सांपडला. दगड यांत कशाकरितां बांधून ठेवलेला असावा, म्हणून त्यानें तो मुद्दाम हातांत घेतला. व तो निरखून पाहूं लागला. तों, त्यावर पुढील मजकूर गेरूनें ( कावेनें ) लिहिलेला त्याला दिसला:—

" जया जिवंत आहे. दुष्ट सरफराजखां माझ्या हातानें मारला गेला. मीं ऐकिलें कीं, बादशाहाही मेला. आपल्या भावाची गांठ घ्या व माझ्या बापाला घेऊन या. विलंब करूं नका. माझ्याबद्दल काळजी करण्याचें कारण नाहीं. मी याच जंगलांत तुम्हांला सांपडेन. "

हा विचित्र मजकूर वाचून धीरसिंह पुन्हां विचारांत पडला; कांहीं वेळानें त्याचा कांहीं तरी निश्चय झाल्यासारखा दिसला. त्यानें जयेचे दागिने व ती पडलेली तरवार आपल्या बरोबर घेतली; तो मुडदा तेथें तसाच एका खड्यांत ढकलून देवविला व ते सर्व जण घोड्यावर स्वार होऊन चालूं लागले.

---

# विसावा परिच्छेद.

ज्या वेळीं धीरसिंह घोडयावर स्वार होऊन किशोरीपासून निघून गेला, तेव्हां तिच्या दुःखास अतिशय भरती आली. धीरसिंह दृष्टीच्या टप्यांतून बाहेर जाईपर्यंत ती एकसारखी त्याजकडे पहात होती. तो दिसेनासा झाल्याबरोबर किशोरी शोकानें व चिंतेनें अगदीं विव्हल होऊन गेली. रतनकुंवर व डुंगरराम तिची समजूत करीत व तिला धैर्य धरण्यास सांगत, पण तें तिला बिलकूल रुचलें नाहीं. तीस थांबून थांबून [illegible] हुंदके येतच होते. अखेर कांहीं वेळानें त्यांनीं घराकडे जाण्याचा [illegible]श्चय केला व रतनकुवर त्या दोघांना आपल्या घरीं घेऊन गेली.

रतनकुंवर किशोरीचें संगोपन मोठ्या प्रेमानें व सावधगिरीनें करीत असे. परंतु जयेच्या वि[illegible]नें किशोरीस एकेक क्षण एकेक वर्षाप्रमाणें वाटूं लागला. अष्टाप्रहर जयेची मूर्ति तिच्या डोळ्यापुढें उभी असे व क्वचित् प्रसंगीं जयेची मूर्ति दिसेनाशी झाली, तर धीरसिंहाची मूर्ति तिच्या डोळ्यासमोर उभी राही. किशोरीच्या मनाला स्वस्थता वाटावी व तिच्या प्रकृतीला आराम पडावा, ह्मणून रतनकुंवर शक्य तितके प्रयत्न मनोभावें करी, परंतु तिच्यावर त्याचा सुपरिणाम कांहींएक झाला नाहीं. तिला कोणाशीं बोलणें बरें वाटेना अथवा तिची कोणी समजत केल्यास तीही तिला रुचेना. जर कोणी तिला चार गोष्टी सांगूं लागला, तर तिचें दुःख कमी होण्याच्या बदला जास्त दुणावे. ती नेहमीं एकांतीं बसून रडत असे. ती पुष्कळ विचार करी, पण सुदीन दिसण्याचा तिला एकही रामबाण उपाय सुचेना. एखादवेळ एखादा उपाय सुचून तिची चर्या प्रसन्न व्हावी, तोंच अडचणी पुढें येऊन दत्त उभ्या राहात; तेव्हां ती पुन्हां निराश होई. सारांश, एकांतीं विचार करीत बसली असतां किशोरीच्या चेहऱ्यावर क्षणोक्षणीं होणारे फेरफार एका दृष्टीनें मोठें

पहाण्यांसारखे असत, ते वर्णन करितां येत नाहींत. रतनकुंवर तिला आपल्याजवळ बसवून नानाप्रकारच्या करमणुकीच्या गोष्टी सांगे, पण त्या तिचें दुःख वाढण्यास कारण होत. तिची वृत्ति अशी कांहीं चमत्कारिक होऊन बसली होती कीं, तीं सांगतां येत नाहीं. कोणी खाण्यास आणून दिलें तर खावें; पिण्यास दिलें तर प्यावें. हसणें खेळणें तर ती कधींच विसरून गेली होती.

अशा तऱ्हेनें किशोरीनें रतनकुंवरच्या घरीं बरेच दिवस काढले. एके दिवशीं तिच्या मनानें पक्कें घेतलें कीं, ' असें येथें पडून राहून काय होणार आहे ? तर गुप्त रूपानें येथून निघून जावें व जोगिणीचा वेष धारण करून रानांवनांतून व डोंगरांपहाडांतून हिंडूनच दिवस घालवावें. जुळल्यास दिल्लीसही जावें व जया जर तेथें गेली असेल, तर हरप्रकारें तिची भेट घ्यावी. साधल्यास धीरसिंहाचेंही दर्शन घ्यावें व पुन्हां जंगलांत परत येऊन या पापमय देहाचा त्याग करावा व अक्षय्य सुख मिळवावें.'

असा विचार करून त्याच रात्रीं तो सिद्धीस नेण्याचाही तिनें निश्चय केला. रात्र पडली, प्रहर रात्र उलटून गेली, घरांत सर्व निजानिज झाली, बाहेरही जिकडे तिकडे शुकशुकाट झालेला तिनें पाहिला; व अंथरुणावरून हळूच उठून तिनें जोगिणीचा वेष घेतला व दरवाजा उघडून दाराबाहेर पडली व ज्या वाटेनें धीरसिंह गेला, तीच दिशा धरून ही नूतन जोगीण किशोरी जंगलाकडे निघाली.



# एकविसावा परिच्छेद.

घर सोडून निघाल्यावर अनेक जंगलांतून व पहाडांतून किशोरी फिरत चालली. तिनें दिवस पाहिला नाहीं, रात्र पाहिली नाहीं, कडक उन्हाचा विचार केला नाहीं, अंधेराची पर्वा केली नाहीं, तहान-भूक मानली नाहीं, झोंप कसली ती तिला मुळींच आली नाहीं, भीतीनें तिला स्पर्श केला नाहीं; व अशा तऱ्हेनें ती दोन डोळे नेतील तिकडे बेधडक चालली होती. कांहीं दिवसांनी फिरत फिरत ती एकेदिवशीं संध्याकाळचे सुमारास एका पहाडावर येऊन पोंचली. तेथें दाट जंगल होतें, परंतु वनफलांच्या अनेक वृक्षांनीं तें भरलेलें होतें व तेथें जवळ पाणीही होतें. सर्व दिवसभर चालून चालून थकल्यामुळें किशोरीनें तेथील काहीं वनफळें खाल्लीं व थोडेसें पाणी पिऊन आकाशाकडे डोळे लावून तेथेंच ती स्वस्थ पडली; तेव्हां आपल्या पूर्वापार स्थितीचें स्मरण करितां करितां तेथें तिचा डोळा लागला.

त्या अर्धवट झोपेंत तिनें एक स्वप्न पाहिलें, तें असें:—

'मंडलगडचा राजवाडा एकाएकीं ढासळूं सागला. तो ढासळतांना पाहून जया व आपण तेथून पळालों. पळतां पळतां आपण एका भयानक जंग-लांत जाऊन पडलों तों तेथें आपणास एका हत्तीनें गाठलें. तो आपणा-ला मारील या भीतिनें आपण पुन्हां पळण्याचा प्रयत्न केला; पण पळतां येईना. इतक्यांत पर्वतावरून एक सिंह गर्जना करीत आला व त्यानें हत्ती-चें गंडस्थळ फोडलें. तेव्हां आपण कोठें तरी पळून जात असतां एक नदी लागली व नदींतील नावेंत बसून आपण जाऊं लागलों. नदीचे म-ध्यभागीं नांव गेल्यावर ती डळमळूं लागली व जया पाण्यांत पडली. ति-ला एका मगरानें गट्ट केली. पुढें नदी व नाव नाहींशी होऊन आपण एका पहाडावर बसलों आहों व जया आपणाला बोलावीत आहे. आपण जयेला भेटण्याकरितां धावत निघालों व एकदम ठेंच लागून पडलों.'

इतकें पाहून किशोरी जागी झाली व पहातें तों जेथें आपण निजलों होतों तेथेंच आपण आहों, असें तिनें पाहिलें.

हें स्वप्न पाहून जयेच्या विचारानें किशोरीचें मन इतकें गोंधळून गेलें कीं, ती कांहीं एक विचार न करितां एकदम उठून चालूं लागली. ' मी कोठें व कां चाललें ' याचें भान तिला बिलकुल नव्हतें. जयेच्या शोधाच्या लालसेनें जिकडे वाट फुटेल, तिकडे ती चालली होती. यावेळीं तिला मी एकटी आहें, याची शुद्ध नव्हती; तिला कसलेंही भय वाटत नव्हतें, अथवा तिच्या मनांत जयेच्या शोधाशिवाय दुसरा विचारही नव्हता. जातां जातां अरुणोदयाच्या पूर्वीं ती एका पर्वताजवळ जाऊन पोंचली. हें स्थान फारच रमणीय होतें. नानाप्रकारचे वृक्षांनीं त्यास शोभा आली होती व तेथूनच वाहत जाणाऱ्या नदीनें तर त्या अरण्याची रमणीयता द्विगुणित झाली होती. त्या नदीचे काठीं जाऊन बसल्यावर किशोरी ध्यानावर आली. तिनें तेथें आपला प्रातर्विधि आटोपला व शुचि[illegible] होऊन ईश्वराचें ध्यान करणार, तोंच तिच्या कानावर एक गाण्याचा स्वर आला; त्याबरोबर तिचा भ्रम नाहींसा झाला. ती तें गाणें एकाग्रचित्तानें ऐकूं लागली. कांहीं वेळानें तिच्या मनांत काय आलें कोण जाणें ? ती एकदम उठली व त्या शब्दाच्या अनुरोधानें चालूं लागली. जसजशी [illegible] गेली, तसतसा गाण्याचा स्पष्ट स्वर तिच्या कानीं पडूं लागला. आणखी कांहीं पुढें जाते तों तिला तें गाणें अगदीं स्पष्ट ऐकूं आलें:—

को— — ई — दि — ल— ब — रको —
ह — ग — र — ब — — ता — दे — रे —

हा स्वर ऐकिल्याबरोबर तिची मुद्रा प्रसन्न दिसूं लागली. डोळे व चालणें यांत चंचलता आली, ती पुढें जातच होती, तों आणखी एक गाण्याची लकेर तिच्या कानावर पडली.

लो — चन — क — भ्र — कु — टि — ल — भृकुटि —
क —र — — का — म — न — क — धा — सुना —
ब — दे — रे —

हें गाणें ऐकल्याबरोबर हा स्वर स्त्रीजातीचा आहे व मागाहून तो जयेचाच आहे अशी तिची पूर्ण खात्री झाली. या वेळीं किशोरीला आपलें शरीरही जड वाटूं लागलें. रानांत चुकलेल्या वासराचा शब्द ऐकून गाईची जी स्थिति होते, तीच स्थिति यावेळीं किशोरीची झाली. ती जयेला पहाण्यास अगदीं उत्सुक झाली. ती एका उंच दगडावर चढली व इकडे तिकडे पाहूं लागली, तरी जया कोठें दिसेना. तेव्हां तिनेंही एक सुंदर गाणें ह्मटलें. व पुढें जाऊन पहाते तो जया एका दगडावर हातावर गाल टेकून बसलेली तिनें पाहिली व गाण्याचा पुढील चरण ह्मटला. इकडे इच्या गाण्याचा स्वर कानीं पडतांक्षणीं जयेनें वळून मागें पाहिलें तो किशोरीला तिनें ओळखिलें. त्यावेळीं त्या उभयतांची झालेली स्थिति वर्णन करतां येत नाहीं. दोघीही परस्पर भेटण्यास अगदी उत्सुक झाल्या होत्या; परंतु त्या पहाडाची रचना अशी कांहीं विचित्र होती कीं, दोघीही समोरासमोर होत्या, परंतु किशोरीला वर जाण्यास मार्ग नव्हता. यावेळीं त्यांच्या मनाची झालेली स्थिति त्याच जाणे ! त्याचें वर्णन करणें अशक्य आहे. क्षणभर दोघीही चित्राप्रमाणें स्तब्ध राहिल्या; पुढें जया किशोरीला ह्मणाली—" तूं तेथेंच उभी रहा. मी तेथें येतें. "

---

## बाविसावा परिच्छेद.

एके दिवशीं संध्याकाळचे सुमारास बादशहा रोशनखां दरबारांत बसला असतां चोपदारानें येऊन वर्दी दिली कीं, कोणी एक परदेशी जवाहिऱ्या देवडीवर आला असून तो खाविंदांचें दर्शन घेऊं इच्छित आहे. बादशहानें त्यास घेऊन येण्याची आज्ञा दिली. चोपदारानें येऊन जवाहिऱ्याला सांगितलें कीं, " ही भेट घेण्याची वेळ नाहीं, पण मी पुष्कळ रदबदली केल्यामुळें बादशहांनीं आपली भेट घेण्याचें कबूल केलें आहे; तर चलावें. पण माझ्या या प्रयत्नाकडे दुर्लक्ष होऊं नये."

जवाहिऱ्यानें हातांतील कडें चोपदाराच्या अंगावर टाकलें, तेव्हां त्यानें सलाम केला व तो त्यास मोठ्या आदरानें दरबारांत घेऊन गेला.

दरबारांतील सलामीचे शिष्टाचार झाल्यावर जवाहिऱ्या दाखविलेल्या जागेवर बसला व आपली जवाहिराची पेटी काढून अनेक प्रकारचीं रत्नें त्यानें बादशहास दाखविलीं. त्यांतून अनेक रत्नांनीं जडलेला एक कंठा बादशहानें पसंत केला. यानंतर जवाहिऱ्यानें एक अप्रतिम पाणीदार मोती बादशहास दाखविलें. तें पाहून बादशहा खुष झाला व त्यानें जवाहिऱ्याला विचारिलें, "याची जोडी तुजजवळ आहे काय ?" हा बादशहाचा प्रश्न ऐकून जवाहिऱ्या कांहीं वेळ गप्प बसला व नंतर ह्मणाला— "यावेळीं याच्या जोडीचें मोती मिळणें माझ्या शक्तीच्या बाहेर आहे."

**बादशहा**—कां बरें ?

**जवाहिऱ्या**—तें अशा मनुष्याजवळ आहे कीं, त्याच्याजवळ मला जातां येणार नाहीं.

**बाद०**—तो कोण आहे व कोठें आहे ?

**जवा०**—तो एक कैदी आहे व बादशहाच्या तुरुंगांत याच शहरामध्यें आहे.

**बाद०**—कैदीच्याजवळ मोती कोठून असणार ?

**जवा०**—खाविंद, तो मंडलगडचा राजा आहे. जर त्याची व माझी गांठ पडली, तर एक सोडून अनेक मोती मला मिळतील, पण जर मी तें बादशहाकरितां नेत आहे, असें त्याला कळलें तर प्राण गेला तरी तो तें देणार नाहीं.

**बाद०**— ( कांहीं वेळ थांबून ) तो काय कारणानें तुरुंगांत पडला ?

**जवा०**—अपराध ह्मणाल तर कांहींएक नाहीं.

**बाद०**—विना अपराध कोण कोणाला कैदेंत टाकील ?

**जवा०**—( हात जोडून ) खांविंद, मी असें ऐकिलें आहे कीं, बा-

दशहा अल्लाउद्दीन त्याच्या मुलीशीं लग्न करूं इच्छित होता व राजा त्याला कबूल नव्हता, व ह्मणूनच बादशहानें त्यांस कैदेंत टाकलें;परंतु आतां तर बादशहाही जिवंत नाहीं व त्या राजकन्येचाही कोठें पत्ता नाहीं. कोणी ह्मणतात, तिनें दुःखानें आत्महत्या केली व कोणी ह्मणतात, ती पळून गेली. याकरितां खाविंद त्याची आतां सुटका करतील तर लोकांमध्यें खाविंदांची कीर्ति होईल. मी बोलून चालून जवाहिऱ्या आहें, तेव्हां राजकारणें मला कोठून कळणार? तरी मनांत आलेली गोष्ट खाविंदचरणीं सादर केली आहे. मान्यामान्य करण्यास हुजुर मालक आहेत.

**बादश**०—जर त्याला सुटण्याची इच्छा असेल, तर त्यानें तीन लाख रुपये हुजूर खजिन्यांत जमा करावें, ह्मणजे त्यास सोडून देण्यांत येईल. जा, त्याला जरूर असेल तर विचारून ये.

**जवा**०—बादशहांची आज्ञा शिरसामान्य आहे. जर माझ्यामुळें कोणाचें कल्याण होत असेल, तर सहज लाभ कां दवडावा?

**बाद**०—ठीक आहे. तर मग तुरुंगावरील दरोग्याला आह्मी हुकूम लिहून देतों, तो दाखवावा. त्या कैद्याची भेट घ्यावी व जर त्याची इच्छा असेल, तर त्यांस इकडे घेऊन यावें.

बादशहाचा लेखी हुकुम घेऊन जवाहिऱ्या कैदखान्यांत गेला व तेथील अधिकाऱ्यांस तो जाऊन भेटला. चांगला श्रीमंत गृहस्थ आहे, असें पाहून त्या अधिकाऱ्यानें त्याचा चांगला आदरसत्कार केला, व येण्याचें कारण नम्रतेनें विचारलें. जवाहिऱ्यानें आपलें नांव, गाव व धंदा त्यांस सांगून बादशहाचा हुकूम त्याचे हातीं दिला. हुकुम वाचून तो ह्मणाला " हुकुम आहे, तो तर योग्यच आहे, पण ही वेळ कैदीला भेटण्याची नाहीं, याला माझा निरुपाय आहे. "

जवाहिऱ्यानें मोठ्या नम्रतेनें एक हिऱ्याची आंगठी त्याचे हातीं गुप्त रीतिनें दिली व ह्मणाला—" या वेळीं आपणच मला बादशहाचे ठिकाणीं आहांत. या वेळीं जर माझी भेट करून दिलीत, तर माझें मोठें काम

केल्यासारखें होईल." त्या अधिकाऱ्यानें त्याची व रतनसिंहाची भेट लागलीच करून दिली, हें निराळें सांगण्यास नकोच.

---

# तेविसावा परिच्छेद.

तिकडे अल्लाउद्दीन बादशहा तीर लागून पडला, तेव्हां तो जिवंत आहे कीं मेला, त्यासंबंधीं वर्तमान कळण्यास वाचक उत्सुक झाले असतील, तर आतां वाचकांनीं त्या जंगलांत चलण्याची तसदी घ्यावी.

अल्लाउद्दीन बादशहाला एकाएकीं दोन तीर लागून तो तेथेंच मूर्च्छा येऊन पडला होता. जेव्हां तो त्या मूर्च्छेतून शुद्धीवर आला तेव्हां त्याला दिसलें कीं, आपण तीर लागून जेथें पडलों होतों, तेथें नसून एका पर्णकुटिकेंत एका मोडक्याशा खाटेवर पडलों आहोंत व एक सुंदर पुरुष आपल्या उशाशीं बसला असून आपल्याला पंख्यानें वारा घालीत आहे. बादशहा सावध झाल्याबरोबर त्या तरुण पुरुषानें त्याच्या मानेखालीं हात घालून त्यास उठवून बसविलें व पाण्यानें त्याचे डोळे पुसले. एक अनोळखी मनुष्य आपली इतक्या काळजीनें सेवा करीत आहे, असें पाहून बादशहाला फारच आश्चर्य वाटून तो ह्मणाला—"तूं माझी इतकी काळजी घेत आहेस, ह्मणूनच मी आतांपर्यंत जिवंत राहिलों आहे, यांत संशय नाहीं; तर, हे तरुण पुरुषा, तूं कोण आहेस ? व माझी इतकी खिजमत तूं कोणत्या उद्देशानें राखीत आहेस ?"

तो तरुण मनुष्य ह्मणाला—"आपण इतके उत्कंठीत होऊं नका. जरा शांत व स्वस्थ रहा, म्हणजे माझी सर्व हकीकत आपणाला कळेल." इतकें बोलून त्यानें एका भांड्यांत कांहीं औषध व पाणी घालून तें बादशहाजवळ दिलें व म्हणाला—"आपण हें औषध घ्यावें, म्हणजे बोल-

ण्याचालण्यास आपणाला थोडासा तकवा येईल. " बादशहानें कांहीं एक न बोलतां तें औषध घेतलें.

अशा प्रकारें त्या तरुण मनुष्यानें त्याच ठिकाणीं बादशहाची बरेच दिवसपर्यंत चाकरी केली. एके दिवशीं पुढें संधि पाहून तो म्हणाला—"खाविंद, आतां तुह्मी माझी हकीकत ऐका. मी पृथ्वीसिंहाचा ज्येष्ठ पुत्र आहे. माझें नांव वीरसिंह. मंडलगडचा राजा रतनसिंह याची कन्या जया, इच्याशीं ज्याचें लग्न ठरलें आहे, तोंच मी वीरसिंह. जेव्हां मला कळलें कीं, आपण रतनसिंहाला कैदेंत टाकलें आहे, तेव्हां मी कांहीं सैन्यासह मंडलगडास गेलों तेथें रतनसिंह अथवा जया यांपैकीं कोणीच नाहीं, असें मला कळलें. तेव्हां त्याच पावलीं मी परत फिरलों. वाटेंत एके दिवशीं प्रातःकाळीं अरवली पर्वताचे पायथ्या पायथ्यानें मी आपल्या सैन्यासह चाललों असतां त्याच वाटेनें आपलें सैन्य जयेला घेऊन चाललेलें माझ्या दृष्टीं पडलें. मी आपल्या सेनानायकाजवळ जयेला सोडून देण्याबद्दल पुष्कळ बोलणें केलें, पण त्यानें तें न ऐकल्यामुळें मला युद्ध करावें लागलें व त्यांत मला जय मिळाला. परंतु जयेची माझी गांठ पडली नाहीं. ती त्याचवेळीं आपल्या चुलत्याकडे जैसलमिरास निघून गेली; तेव्हां मी तसाच दिल्लीस येऊन गुप्त रूपानें राहिलों. जर मला वाटलें असतें, तर रतनसिंहाची सुटका मीं पाहिजे त्या तऱ्हेनें केली असती; परंतु विश्वासघाताचें काम करणें क्षत्रियाचें शील नाहीं. ज्या दिवशीं आपण शिकारीला निघाला, त्या दिवशीं मीही तुह्माबरोबर निघालों. तुह्मी एकटेच पुढें निघून आला, पण आपल्या पाठीवर मी होतों. आपल्याला एका मुसलमानानें दोन तीर मारले, तें मीं पाहिलें; पण तो कांहीं अंतरावर दूर असल्यामुळें मला त्यांस धरतां आलें नाहीं. मी त्याचा पाठलाग करण्याचें सोडून देऊन आपल्याकडे आलों तों आपण मूर्च्छा येऊन पडला होता; तेव्हां मीं आपणास येथें उचलून आणलें व आपण सावध व्हावें, ह्मणून पुष्कळ प्रयत्न केले; अखेर ईश्वर-कृपेनें माझ्या त्या प्रयत्नास यशही आलें. आज सकाळीं मला अशी बातमी

समजली आहे कीं, आपल्याला वाघानें खाल्लें, असा सर्व देशांत पुकार झाला असून दिल्लीच्या तक्तावर कोणा रोशनखां नांवाच्या मनुष्यास बसविण्यांत आलें आहे. "

हें वर्तमान ऐकून बादशहा वीरसिंहास कडकडून भेटला व ह्मणाला— "वीरसिंहा, तूं माझ्यावर जे उपकार केले आहेस, ते माझ्या हातून कदापि फिटणार नाहींत; फक्त आतां मी इतकेंच सांगतों कीं, जोंपर्यंत माझ्या जिवांत जीव आहे, तोंपर्यंत तुझे उपकार मी कदापि विसरणार नाहीं. "

वीरसिंह ह्मणाला—" यांत उपकार ते कसले? मी जें काहीं केलें, तें मी आपल्या कुलाला व धर्माला साजेल असेंच केलें, त्यांत विशेष तें काय आहे? आतां माझी इतकीच इच्छा आहे कीं, आपल्याला दिल्लीच्या तक्तावर मीं पहावें. तर आपण १।२ दिवस येथेंच रहा, मी आपली सर्व फौज घेऊन येथें येतों; मग आपण दिल्लीस जाऊं. "

---

## चोविसावा परिच्छेद.

जवाहिऱ्याला घेऊन तुरुंगावरील दरोगा ज्या तळघरांत रतनसिंहाला ठेविला होता, तेथें गेला. जातांना दरोग्यानें पहिला दरवाजा उघडून ते त्या अंधार कोठडीपाशीं जाऊन पोंचले. तें स्थान पाहिल्याबरोबर जवाहिऱ्यानें दरोग्यास एक दिवा आणण्यास सांगून त्यास तेथेंच उभे राहण्यास विनंती केली व आपण एका नोकरासह आंत गेला. जवाहिऱ्याच्या सांगण्याप्रमाणें दरोग्यानें वागणें कोणास आश्चर्यकारक वाटेल, परंतु बादशाही हुकुम व हिऱ्याची अंगठी यामुळेंच दरोगा बाहेर उभा राहिला, हें सूज्ञ वाचक जाणतीलच. जगामध्यें धन ही एक अशी अजब वस्तु आहे कीं, त्याच्या साहाय्यानें वाटेल तें करतां येतें. अपराधी दोषमुक्त करतां येतो व निरापराध्याला शिक्षाही देतां येते.

तळघराचे अंधार कोठडींत गेल्यावर जवाहिऱ्यानें पहिलें तों रतन-

सिंह अतिशय म्लान व क्षीण झाला असून तो परमेश्वर भजनांत अगदीं निमग्न झाला आहे. जवाहिऱ्याचे पाय वाजल्याबरोबर रतनसिंहानें डोळे उघडले व तो ह्मणाला—" तुह्मी मला फांशी देण्याचा हुकुम घेऊन आला आहां काय ? " जवाहिऱ्या लवून सलाम करून नम्रतेनें ह्मणाला—" नाहीं महाराज ! ! "

रतनसिंह—( एक दीर्घ श्वास सोडून ) अजूनही माझ्या पापाचे घडे भरले नाहींत तर मग ?

जवाहिऱ्या—धीर धरा, परमेश्वर कृपाळू आहे.

रतन०—असेल; पण माझ्यासारख्या अधमाला मात्र नाहीं.

जवा०—परमेश्वर दीनांचा वाली आहे. आपणास ठाऊक आहे कीं, सुख अथवा दुःख यालाही सीमा असते. आतां आपल्या दुःखाचे दिवस संपले आहेत असें आपण समजा.

रतन०—तूं कोण आहेस?

जवा०—मी कोण आहें, तें आपल्याला सांगतों; पण आपण अगदीं हळूं हळूं बोला; कारण आपल्याशीं ज्या गोष्टी मला बोलावयाच्या आहेत, त्या गुप्त आहेत. मी पृथ्वीसिंहमहाराजांचा कनिष्ठ पुत्र व वीरसिंहाचा सहोदर आहें. मी जवाहिऱ्याचा वेश घेऊन आपल्याला भेटण्याची बादशहाची परवानगी मिळवून आलों आहें. माझें नांव धीरसिंह.

हें ऐकिल्याबरोबर धीरसिंहास रतनसिंहानें पोटाशीं धरले व प्रेमविव्हल होऊन तो ढळढळा रडूं लागला.

धीरसिंह—महाराज, आपणाला ठाऊकच असेल कीं, अल्लाउद्दीन बादशहाला थोडक्या दिवसांपूर्वी कोणी घातक्यानें तो शिकारीस गेला असतां ठार मारले व सध्यां त्याचा कोणी नातलग बादशाही तक्तावर बसला आहे.

हें वर्तमान ऐकिल्याबरोबर रतनसिंहाच्या चेहऱ्यावर आवेश दिसूं लागला, त्याचे डोळे लाल झाले व त्याच्या भृकुटी वक्र झाल्या.

स्वारी किल्यापर्यंत येऊन पोंचली. सलामीच्या तोफा धडाधड होऊं लागल्या, सगळें शहर मंगलध्वनीनें अगदीं दणाणून गेले, जिकडे तिकडे आनंदीआनंद झाला; व दरबारांतील अमीर उमराव लोकांचे मुजऱ्यावर मुजरे सुरूं झाले.

बादशहानें एका खुल्या मैदानांत दरबार भरविण्याची आज्ञा दिली. लोकांचा तेथें अगदीं तोबा उडाला. एक उंच जागा तयार करून मध्यें बादशाही तक्त मांडलें. बादशाही स्वारी त्याजवर आरूढ झाली. तक्ताचे अगदीं जवळ वीरसिंहाला मोठ्या आदरसत्कारानें बसविण्यांत आले व खुद्द बादशहानें घडलेली सर्व हकीकत प्रजाजनांस विदित करून वीरसिंहाची फारच प्रशंसा केली. वीरसिंहाची प्रशंसा होत असलेली ऐकून वीरक्षत्रिय लोकांचा आनंद गगनांत मावेनासा झाला. याचवेळीं बादशहानें आज्ञा दिली कीं, राजा रतनसिंहाला तुरुंगांतील सोडून इतमामानें येथें आणावा. राजपुत्र वीरसिंहानें यावेळीं इच्छा प्रदर्शित केली कीं, मी स्वतः जाऊन त्यास घेऊन येतो. यावर तुरुंगांतील दरोगा हात जोडून ह्मणाला—"खाविंद, आपण आल्याचें वर्तमान ऐकून आह्मांला मागील कांहीं एक शुद्ध राहिली नाहीं. तुरुंगांचा दरवाजा उघडा राहिला व पहारेकरी सर्व इकडे निघून आले, इतक्या वेळांत जवाहिऱ्या व रतनसिंह कोठें निघून गेले कोण जाणें?"

हें वर्तमान ऐकून बादशहाला प्रथमतः थोडे वाईट वाटलें; तथापि पुढें त्याची सुटका झाल्याबद्दल त्यांस आनंद झाला; पण वीरसिंहाच्या चेहेऱ्यावर मात्र चिंतेचें जाळें पसरल्यासारखें दिसलें.

वीरसिंहानें बादशहाजवळ कांहीं दिवसांची रजा मागितली, बादशहानें प्रथमतः रजा देण्याचें नाकारिलें, परंतु त्याच्या अत्याग्रहामुळें अखेर बादशहानें त्यास कांहीं दिवस जाण्यास परवानगी दिली.

वीरसिंह दरबारांतून उठून आपल्या सैन्यांत येऊन दाखल झाला व आतां कूच करणार तोंच एका ब्राह्मणानें येऊन आशीर्वाद दिला. वीरसिंहानें विचारिलें, "आपली काय इच्छा आहे," तेव्हां ब्राह्मण ह्मणाला.—

"महाराज, मी मंडलगडचा राहवासी आहें. माझें नांव डुंगरराम. आपलें बादशाही सैन्याबरोबर युद्ध झालें, तेव्हां मी राजकन्येबरोबर होतों. तेथून तिच्याबरोबर जैसलमिरासही मी गेलों होतों; व कांहीं दिवसपर्यंत तेथें राहिलोंही होतों."

वीरसिंहाचें लक्ष त्याच्या बोलण्याकडे जास्तच वेधलें; तेव्हां डुंगररामानें घडलेलें सर्व वृत्त त्यास कळविलें; व अखेर ह्मणाला—"आपणाला योग्य दिसेल तें आपण करालच; पण माझी विनंती आहे कीं, आपण हा राजमार्ग सोडून जंगलचा रस्ता धरावा. तिकडे १।२ दिवस हिंडून शोध करावा, दैवयोगानें कांहीं पत्ता लागला, तर ठीकच आहे, नाहींतर मग हा आपला राजमार्ग आहेच."

ती वार्ता ऐकून वीरसिंह चिंतासागरांत निमग्न झाला. कांहीं वेळ गेल्याबर त्यानें सर्व सैन्यास घरीं जाण्याचा हुकूम केला व फक्त २।४ सेवक व डुंगरराम ह्यासहीत त्यानें जंगलचा रस्ता धरला.

---

## सव्विसावा परिच्छेद.

धीरसिंह व रतनसिंह तुरुंगांतून निघाले, ते थेट शहराबाहेर येऊन पोचले; तेव्हां रतनसिंहानें विचारलें, "धीरसिंहजी, आतां कोणत्या रस्त्यानें व कोठें जावयाचें?"

धीर०—महाराज, माझी इच्छा अशी आहे कीं, आपण हमरस्ता सोडून जंगलांतून जाणें उत्तम होईल. कारण जर आपल्या शोधास बादशहाचे लोक आले, तर मोठें कठीण आहे; ह्मणून जंगलांतून जाणेंच उचित आहे. पुढें गेल्यावर मग आपण काय करावयाचें तें ठरवूं. रतनसिंहाला तो विचार पसंत पडून त्यांनीं जंगलाचा रस्ता सुधारला व ते झपाट्यानें निघाले. कांहीं दूर गेल्यावर धीरसिंहानें थोडा वेळ विचार करून जंगलांतील आन्या मार्गानेंच जाण्याचा निश्चय केला. सायंकाळचे सुमारास ते

एका रमणीय जंगलांत जाऊन पोंचले. सूर्य अस्तास जाण्याची ही वेळ असल्यामुळें तो वनप्रदेश फारच शोभिवंत दिसत होता. दिवसभर चालून हे अगदीं दमून गेले होते, सबब रतनसिंह ह्मणाला–" धीरसिंहजी, जर येथें विश्रांति घेण्यास योग्य स्थळ असेल, तर आजची रात्र येथेंच राहून उद्यीक प्रात:काळीं पुढें जाऊं. " धीरसिंह ह्मणाला—" आपण येथें बसा; मी इकडे तिकडे हिंडून कोठें निवाऱ्याची जागा असल्यास पहातो. सांपडल्यास आपणाला तेथें घेऊन जाण्यास मी आतां परत येतों. "

इतकें सांगून धीरसिंह निघाला. थोडासा दूर गेल्यावर त्याला एक पर्णकुटिका दिसली. तो तेथें गेला; तों त्या कुटिकेच्या सभोंवतीं फुलझाडांचा बाग त्याला दिसला. तेथें जवळच एक पाण्याचा झराही होता. पर्णकुटिकेंत कोणीही नव्हते, ह्मणून कांहीं वेळ तो तेथेंच बसला; परंतु कोणीही येईना, तेव्हां त्यानें रतनसिंहाला बोलावून आणलें व कांहीं काटक्याकुटक्या जमा करून त्यानें चकमकीनें विस्तव पाडून आगटी पेटविली; इतक्यांत एक साधू तेथें आला, तेव्हां त्या दोघांनींही उठून त्यास प्रणाम केला. व धीरसिंह ह्मणाला:—" आह्मी फार लांबून आल्यामुळें अगदीं थकून गेलों आहोंत, तर या कुटिकेमध्यें रात्रभर विश्रांति घ्यावी असें मनांत आहे. आपली आज्ञा घेतल्याशिवाय आह्मी येथें आलों, याची क्षमा असावी. " साधूनें त्यांच्याकडे बराच वेळ निरखून पाहिलें व नंतर तो मोठ्या आदरानें ह्मणाला— " ही पर्णकुटिका याचकरितां बांधली आहे, तर आपण येथें स्वस्थ रहावें. आपल्यासारख्या लोकांचा येथें समागम झाला, याबद्दल मला फार आनंद वाटतो " ! कांहीं वेळ इकडच्या तिकडच्या गप्पा मारल्यावर साधूनें बाहेर जाऊन आतां येतो ह्मणून सांगून तो पर्णकुटिकेच्या बाहेर पडला व तेथून जवळच असलेल्या दुसऱ्या एका पर्णकुटिकेंत तो गेला. तेथें दोन तरुण स्त्रिया कांहीं गोष्टी सांगत बसल्या होत्या. साधूमहाराज आल्याबरोबर त्यांपैकीं एकजण ह्मणाली—" साधूमहाराज, यावेळीं आपली स्वारी इकडे कोणीकडे ? "

साधु ह्मणाला—" आजचा दिवस मोठ्या आनंदाचा आहे. कारण माझ्या आश्रमामध्यें दोन अतिथी नुकतेच आले आहेत, तरी तुमच्याजवळ जर काहीं कंदफलमूलें असतील तर द्यावींत, ह्मणजे तीं त्यांना मी नेऊन देईन. "

त्या मुलींनीं आपल्याजवळील कंदमूलें साधूस मोठ्या आनंदानें दिलीं. साधुनें तीं घेऊन आपल्या पाव्हण्यापुढें आणून ठेविलीं व ह्मणाला— " माझ्या हातून आपलें योग्य आदरातिथ्य होणार नाहीं, तरी ही कंदमूलें भक्षण करून पाणी प्यावें व येथें स्वस्थ विश्रांति घ्यावी. " रतनसिंहानें व धीरसिंहानें साधूनें दिलेलीं कंदमूलें आनंदानें भक्षण करून जलपान केलें व पर्णकुटिकेचे आंत दोन मृगचर्मे होतीं तीं घेऊन ते निजले. साधू महाराजही आपल्या व्याघ्रांबरावर निद्रिस्थ झाले. प्रातःकाळ झाल्याबरोबर हे प्रातर्विधी करण्यास बाहेर जातात तोंच वीरसिंह समोरून येतांना त्यास दिसला. त्याला पाहिल्याबरोबर धीरसिंह धांवत धांवत जाऊन वीरसिंहाचे गळीं पडला. वीरसिंहही आश्चर्यचकित झाला व त्यानें त्याला प्रेमालिंगन दिलें. धीरसिंहानें सुचविल्यावरून वीरसिंह रतनसिंहाचे पाया पडला, तेव्हां रतनसिंहानें त्यास उचलून आशीर्वाद दिला. त्या सर्वांना भेटीबद्दल फारच आनंद झाला व ते आपल्या पूर्वकथा एकमेकांना सांगत तेथेंच बसले. इतक्यांत तो साधू रतनसिंहास प्रणाम करून ह्मणाला— " महाराज, मी आपला सेवक जयमल्ल आहें. आपली कन्या जया किशोरीसह या आश्रमामध्यें सुखरूप आहेत. " हें ऐकिल्याबरोबर ते सर्वजण जयेच्या आश्रमाकडे गेले. आपल्या पर्णकुटिकेसभोंवतींच्या फुलझाडांना किशोरी पाणी घालीत होती व जया एका हरिणबालकाबरोबर तेथेंच खेळत बसली होती; इतक्यांत हे तेथें जाऊन पोंचले; तेव्हां जया व किशोरी रतनसिंहाचे गळ्यास मिठ्या मारून रडूं लागल्या. रतनसिंहालाही त्यावेळीं मोठा गहिंवर आला.

या अनायासानें झालेल्या भेटीमुळें त्या सर्वांना जो आनंद झाला तो

लिहितां येत नाहीं. यावेळीं तो सर्व वनप्रदेशही आनंदमयच दिसूं लागला. तेथें नैसर्गिक होणारी प्रत्येक गोष्ट यांना आनंददायकच वाटूं लागली. वृक्षांचे हालणें, लतांचें डोलणें, व पशुपक्षांचें ओरडणें मंगलच आहे, असेंही त्यांना वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

---

# उपसंहार.

राजपुत्र वीरसिंह व धीरसिंह रतनसिंहाची आज्ञा घेऊन आपल्या राजधानीस निघून गेले व रतनसिह, जया, किशोरी, जयमल्ल व डुंगरराम मंडलगडास येऊन पोंचले. यावेळीं मंडलगडास जिकडे तिकडे आनंदीआनंद झाला. जें मंडलगड शहर इतके दिवस उदास दिसत होतें. तेंच शहर यावेळी मोठ्या भरभराटीचें दिसलें. शहरांतील लोकांच्या आनंदास सीमा राहिली नाहीं. चोहोंकडून मंगलध्वनी ऐकूं येऊं लागला. राजवाड्यांत अपूर्व शोभा दिसूं लागली. प्रजाजन महाराजांना भेटायाकरितां सारखे येत होते व रतनसिंहही त्यांचें सांत्वन करीत होता. तिकडे अंत:पुरांतही असाच आनंददायक देखावा दिसत होता.

दुसरे दिवशीं रतनासिंहानें दरबार भरवून सर्व लोकांना सांगितलें कीं, ईश्वराच्या कृपाकटाक्षानें सर्व आपत्ति नाहींशीं झाली. आतां जयेचा विवाह वीरसिंहाबरोबर करण्याचे ठरलेंच आहे, परंतु याचवेळीं किशोरीचा विवाहही होणें अवश्य आहे. किशोरी व जया या लहानपणापासून एकेच ठिकाणीं वाढल्यामुळें त्यांचें परस्पर प्रेमही तसेंच आहे. तेव्हां या दोघी एकेच ठिकाणीं पडल्या तर फारच उत्तम होईल; तेव्हां मला वाटतें, जर किशोरीचा विवाह धीरसिंहाबरोबर झाला तर दुधांत साखर पडल्यासारखेंच होईल.

काहीं दिवस गेल्यावर रतनसिंहानें किशोरीचा विवाह धीरसिंहाबरोबरच निश्चित केला. किशोरी ही रतनसिंहाची पुतणी होय. किशोरी गर्भांत असतांनाच तिचा बाप वारला व आईही इचा जन्म झाल्यावर १।२ वर्षांनीं वारली होती; व यामुळें लहानपणापासून किशोरी व जया या एके ठिकाणींच लहानाच्या मोठ्या झाल्या व त्यांचें प्रेमही एकमेकींवर अतिशय राहिलें.

लग्नतिथि ठरवून दोन्हीं लग्नें मोठ्या थाटानें झालीं. वरात झाल्यावर या दोन्ही मुली आपल्या सासरी जाऊन सुखांत व आनंदांत नांदूं लागल्या. या दोघीं बहिणीबहिणींचें अथवा जावाजावांचें प्रेम जीवमानपर्यंत अखंड राहिलें; व तीं दोन्ही जोडपीं आनंदांत नांदूं लागलीं.

समाप्त.